


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १७ वे ] एप्रिल १९६४ [ अंक ७



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

# नवभारत

वर्ष सतरावे | अंक सातवा

एप्रिल १९६४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

अनुक्रमणिका






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... ... ... ... | | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ..., ... ... | | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | | २·०० |

राजवाडे-प्रतीतून निसटलेल्या

कै. द. वें. केतकर

# ज्ञानेश्वरी एकशेचौदा ओव्यांचे प्रकट प्रदर्शन

[ ओवी त्याग किंवा ग्रहण यांची उपपत्ती- " नवभारत-जून, जुलै, आगस्ट- १९५९ यात दिली आहे. ती वाचकानी पहावी.

काही खुलासा— राज० प्रत = सरकारमुद्रित १ ली आवृत्ति.
नि-१ = निसटलेल्या ओव्यांपैकी क्रमांक.
अ. १-२४२ = अध्याय १ मध्ये नवीन ओवीचा २४२ क्रमांकाने प्रवेश. ]

## पार्श्व

राजवाडेप्रतीचा वापर करता करता तीत बऱ्याच त्रुटी आहेत अशी खातरी झाली. अर्थात् त्या त्रुटींचा शोध चालू केला. जबर नाद लागला. इतका की मस्तक ठिकाणावर राहीना. तसेच सहा शर्टें करायची म्हणून घरून पैसे घेऊन चार शर्टांचे पैसे ओव्याच्या नकला ने-आण- यात खर्च करावयाचे. म्हैसूर- मद्रास- तंजावर- ग्वालेर, उज्जयिनी, बनारस, बिकानेर पर्यंत मजला माराव्या लागल्या. साफल्य, नैष्फल्य याची गणना न करिताच पुढे पाऊल चालविले. असो याचे वर्णन –

आवडी आणि लाजवी ।
व्यसन आणि शीणवी ।
पिसें आणि न भुलवी ।
तरी तेंचि काई ॥ –ज्ञा.८६–१२४.

वरील ओवीत ज्ञानदेवांनी स्पष्ट केलेच आहे. असो. याप्रमाणे इ. स. १९६० अखेर वयाला ७० वर्षे पूर्ण होईपर्यंत २५-२६ वर्षे ( इतर शास्त्रे, व त्यातील संशोधने संभाळून ) हे संशोधन केले. सांप्रत ७४ वे वर्ष चालू आहे. पहिला जोम आता कसा येणार !! म्हणून केलेले महत्त्वाचे सप्रमाण संशोधन बांधवांना देऊन मोकळा होणार आहे. " नवभारत " हे मासिक, माझे उद्दिष्ट सफल करण्यास सिद्ध आहे.

खाली क्रमाने एकंदर ओव्या दिल्या आहेत. प्रत्येक ओवीला राज० प्रतीला अनुलक्षूनच क्रमांक दिला आहे. या दिलेल्या क्रमांकानी सर्व ओव्या त्या त्या स्थली प्रविष्ट करावयाच्या आहेत. शिवाय राज० पृष्ठ व मुद्रित ओवी सांगून " या मुद्रित ओवीच्या खाली " अशीही विशिष्ट सूचना दिली आहे.

सर्व ओव्या राज० प्रतीत समाविष्ट केल्या म्हणजे

| अध्याय | ओव्या | अध्याय | ओव्या |
|---|---|---|---|
| १ ला | २७५ | १० वा | ३३२ |
| २ रा | ३७५ | ११ वा | ७०५ |
| ३ रा | २७७ | १२ वा | २४६ |
| ४ था | २२५ | १३ वा | ११६९ |
| ५ वा | १७९ | १४ वा | ४१६ |
| ६ वा | ४९७ | १५ वा | ६०० |
| ७ वा | २०६ | १६ वा | ४७३ |
| ८ वा | २७० | १७ वा | ४३२ |
| ९ वा | ५३२ | १८ वा | १८०० |
| (अ) | २८३६ | (ब) | ६१७३ |

एकंदर ( अ + ब ) = ९००९

वरीलप्रमाणे नवीन अध्यायवार संख्या येऊन एकंदर ज्ञानदेवींची ओवीसंख्या ९००९ ओव्या येते.

## प्राचीन मूलधार

ओवी ९००९ संख्या

( १ ) शके १६७५ म्हणजे सव्वादोनशे वर्षांच्या पूर्वीच्या हस्तलिखित भारदे प्रतीत शेवटी –

नव सहस्र नव ओवी ।
टीका मूळ हे ज्ञानदेवी ।
जे श्रवणें मोक्षपदवी ।
भलतेयाही दे ॥

या ओवीतील- साडे तीन चरणे- भलेतेयाही- पदवी- नवसहस्रनवओवी- या शब्दप्रयोगावरून ती शके १३५०-१४०० च्या अवधीतील किंवा तत्पूर्वीची आहे. चोंभाकवीच्या सारखीच ही सरणि आहे.

ओवीसंख्या सांगणारी ओवी, ही अनेकांच्या वाचनात आलेलीही असावी. पण तिजकडे पूर्ण दुर्लक्षच



अनुक्रमणिका








झालेले दिसते. याचे कारण म्हणजे ज्या हस्तलिखितात ही ओवी आहे त्याचीच ओवीसंख्या ९००९ पेक्षा जास्त आहे. म्हणजे त्या पोथीतही श. १६७५ च्या पूर्वीपासूनच क्षेपक ओव्या शिरलेल्या होत्या. लेखकाने केवळ नक्कल केली. त्यात मूळ ओवीसंख्येची ओवी परंपराक्रमाने येत गेली. ओवीसंख्या निर्णीत करण्याच्या भानगडीत कोणीच पडला नाही हे उघड आहे.

आज असा प्रसंग निर्माण झाला आहे की– जी पोथी पहावी त्या प्रत्येक पोथीत ओवीसंख्या वेगळी. ही परिस्थिति पुढे चालू नये, तिला पायबंद घालावा– या हेतूने, उपलब्ध झालेले प्राचीन प्रमाण आम्ही आधाराला घेतले.

परंतु एकाच प्रमाणावर विसंबण्यापेक्षा त्याच्या जोडीला आणखी एकादे प्रमाण मिळाले तर अधिक बरे असे वाटले. कारण त्यायोगे प्रमाणाला बळकटी येऊन ते ग्राह्यतर होईल, व नंतर त्या आधारे एकंदर ओवीसंख्या निश्चित स्वरूपाने जनतेपुढे येईल. याप्रमाणे विचार करून पुढे पुनः तिकडे हिकडे जोरात पत्रव्यवहार सुरू केला. बराच काळ गेला, परंतु फळ लाभले ते असे –

(२) आळंदी येथील दुसऱ्या एका हस्तलिखितात (धनेश्वर-१-९ अध्या.) नेमकी हीच ओवी आहे.

(३) आळंदी हस्तलिखित लेखकाचा "ज्ञानदेवी ओवीसंख्या ९००९" असा स्पष्ट शेरा गद्यात आहे.

या परिपुष्ट अशा तीन प्राचीन आधारावर ९००९ ही संख्या स्थित आहे. म्हणूनच ती स्वीकार्य आहे.

## पुढे

याप्रमाणे ९००९ ओव्यांची राजवाडेप्रत तयार झाली म्हणजे तीच प्रफुल्ल सजलेली प्रत – तीतील ओव्यांच्या ज्ञानदेवमुद्रांकामुळे- ज्ञानदेवमुद्रांकित – "ज्ञानेश्वरी"– सिद्ध होईल.

ही सिद्ध ज्ञानेश्वरी अथ पासून इतिपर्यंत ओवीक्रम परंपरेच्या बाबतीत इतर हस्तलिखिते व मुद्रित अशा सर्व ज्ञानेश्वरी प्रतीना उत्कृष्ट मार्गदर्शन करण्यास समर्थ अशीच होईल– यात शंका नाही. कारण त्यायोगे सर्व ज्ञानेश्वरीची एकंदर ओवीसंख्या ९००९ हीच एक होईल, व सर्व प्रतीत एका ओवीला सर्वत्र नेमका एकच क्रमांक दिसेल.

बऱ्याच मुद्रितांत व हस्तलिखितात या ११४ ओव्यांपैकी बऱ्याच ओव्या आहेतच. केवल नाहीत त्याच ओव्या – दिलेल्या क्रमांकाच्या जागी प्रविष्ट केल्या म्हणजे झाले. राजवाडे प्रतीतील मुळातील काही ओव्या इतर प्रतीत नसण्याचा थोडा संभव आहे. त्या ओव्या त्या इतर प्रतीत अवश्य– त्या क्रमांकस्थानी घालवयाच्या व प्रक्षित आहेत त्या सर्व काढून टाकल्या म्हणजे पूर्णता येईल.

"ज्ञानेश्वरी – सर्वस्व" या स्वकृत ग्रंथात न. चिं. केळकर यांनी अशा प्रकारची योजना एखाद्या तज्ज्ञांच्या मंडळाद्वारे सुचविली आहे आम्ही आजपर्यंत वाट पाहिली. कोणी पुढे आला नाही– येण्याचे चिन्हही नाही. म्हणून आम्हाला या सत्कर्माचे बाबतीत जे पटले ते करून जनतेसमोर मांडले आहे. येथे एक गोष्ट लक्षात ठेवायची –

(१) अधिक ओवी घ्यावयाची तर ती कसौटीला लावून उतरल्यावर घ्यावयाची.

(२) ओवी टाकावयाची तर तीही कसाला उतरली नाही तरच टाकावयाची.

(३) नवभारत, आक्टोबर १९६३ पृ. ४० वर संपूर्ण कसौटी दिलेली आहे. तिचा उपयोग करावा- किंवा अन्य कसौटीचा उपयोग करावा.

## एकमुखी ज्ञानेश्वरी

भगवद्गीतेप्रमाणेच ज्ञानेश्वरीचे स्वरूपही "सर्वत्र एकमुखी" व्हावे हे शुभ व लोककल्याणाचे उद्दिष्ट नजरेपुढे ठेवून ही जी आम्ही आजवर यातायात केली तिचा अल्पांशाने का होईना–ज्यासंगी जनतेला लाभ मिळाला तरी मला परमानंद होईल–हे काय सांगावयास का पाहिजे ?

आम्ही ही योजना अत्यंत कसोशीने व निर्मळ मनाने केली असल्याने ती जनतेपुढे मांडण्यास आम्हास मुळीच संकोच वाटत नाही.

आता क्रमवार ओव्यांचा प्रवेश खालीलप्रमाणे—

### अध्याय १ ला

नि० १ अ० १–२४२

ऐसे पार्थ तिये अवसरी ।<br>
म्हणे देवा अवधारी ।<br>
एया कल्मषाची थोरी ।<br>
सांघैन तुज ॥ २४२ ॥

अ० १, राज० पृ० २४ मुद्रित क्र० २४१ च्या खाली वरील नि–१ ही २४२ क्रमांकाने प्रविष्ट करणे.

ग्राह्यत्वाचे कारण— पहा– नवभारत जून १९५९ पृ. ५६.

नि० – २ अ० १–२६७.

ऐसें देसौन सकळ ।
अर्जुनें आपुलें कुळ ।
मग म्हणे राज्य तें केवळ ।
निरयभोगु ॥ २६७ ॥

अ० १. राज० पृ० २७ मुद्रित क्र० २६५च्या खाली वरील नि–२ ही २६७ क्रमांकाने प्रविष्ट करणे.

ग्राह्यत्वाचे कारण — पहा– नवभारत जून १९५९ पृ. ५६–५७.

| ओ० | राज० | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | २७३ | २७४ | २७५ |
| अधिक | + २ | + १ (नि–२) | – |
| एकूण | २७५ | २७५ | २७५ |

१ ला अध्या० अखेर ओवीसंख्या, २७५

## अध्याय २ रा.

नि०— ३ अ० २—३०१.

पैं कूर्म कां जैसा ।
अंगें आवरी गुडाकेशा ।
इंद्रियां उपरमु तैसा ।
होय जैं यया ॥ ३०१

नि०– ४ अ० २–३०२

तैं तेयाची प्रज्ञा ।
स्थिर झाली प्राज्ञा ।
इंद्रियार्थी अवज्ञा ।
न करीतचि ॥ ३०२

अ० २ राज० पृ. ६१ मुद्रितक्रमांक ३०१, ३०२ यांच्या जागी वरील नि–३, व नि–४ या दोन ओव्या ३०१, व ३०२ या क्रमांकानी प्रविष्ट करणे.

राज० पृ. ६१ वरील मूळ ३०१, ३०२ या ओव्यांची व्यवस्था.

( १ ) मूळ ओवी ३०१–पण ती आता ३५२ करावयाची—

देखैं कूर्म जिया परी ।
उवायिला अवेव पसरी ।
ना तरी इच्छावशें आवरी ।
आपणपेंचि ॥ ३५२

( २ ) मूळ ओवी ३०२. पण आता हिला ३५३ नवा क्र० मिळतो.

ऐसी इंद्रियें आपैंती होति ।
जेयाचें म्हणितलें म्हणिये करीति ।
तेयाची प्रज्ञा जाणें स्थिति ।
पातली असें ॥ ( गाळणे )

मुळात पृ. ६६ वर ही वरील ओवी ३५२ या क्रमांकाने आहे. अर्थात् ३५२ चाच ३५३ क्र. करावयाचा व ६१ पृष्ठावरून आणलेली ३०२ ओवी ही गाळावयाची.

ग्राह्यत्वाचे कारण–पहा– नवभारत मासिक ( वाई ) जून–१९५९ पृ. ५७–५८.

**पुनः एकदा**

राज० पृ. ६१ वरील मूळ ३०१, ३०२ या ओव्यांची व्यवस्था—

( १ ) राज० पृ. ६६ श्लो० ६८ च्या खाली ३५१ क्रमांक आहे, राज० पृ. ६१ वरील मूळ मुद्रित ३०१ या ओवीला ३५२ क्रमांक देऊन, ती पृ. ६६ वरील ३५१ क्र० च्या खाली, ३५२ क्रमांकाने घेणे.

( २ ) पृ. ६१ वरील ३०२ क्रमांकाला ३५३ हा क्रमांक देऊन पृ. ६६ वरील ३५२ या नवीन क्रमांकाखाली ३५३ या क्रमांकाने दाखल करावयाची परंतु ती राज० पृ. ६६ वर ३५२ या भिन्न क्र० आहेच. अर्थात् तिलाच ३५३ वी करून श्लो० ५८ खालून आणलेली ३०२ ही ओवी गाळावयाची. भिडे, दांडेकर प्रतीतील ३०१, ३०२, या दोन्ही गाळायच्या.

| ओ० | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ३७४ | ३७५ | ३७५ |
| + नि. ३,४ | + २ | + २ | + २ |
| – उणे एक मूळ ३०२ | – १ | – २ (३०१–३०२) | – २ (३०१–३०२) |
| एकूण | ३७५ | ३७५ | ३७५ |

| | |
|---|---|
| | २७५ |
| | + ३७५ |
| द्वितीयाध्याय अखेर | ६५० |

( पहा. नवभारत जून १९५९ पृ. ५७, ५८. )










## अध्याय ३ रा.

नि० – ५   अ० – १४५

परिसौं पां सव्यसाची ।
मूर्ति लाहोनि देहाची ।
खंती करिती कर्माची ।
ते गांवढे गा ॥ १४५ ॥

अ० ३ राज० पृ. ८३ मुद्रित क्रमांक १४४ च्या खाली वरील ओ० १४५ क्रमांकासह प्रविष्ट करणे. ग्राह्यत्वाचे कारण– पहा: नवभारत जून. १९५९ पृ. ५८, ५९, ६० व नवभा० आक्टोबर १९६३.

नि – ६   अ० ३ – २०४.

सर्वस्वें शिणोनि एथें ।
आजन्मावी संपत्तिजोंत ।
तेणें स्वधर्मु सांडौनि देहातें ।
पोखावें काई ॥ २०४ ॥

अ० ३ राज० पृ. ८९. मुद्रितक्रमांक २०२ च्या खाली वरील ओवी २०४ क्रमांकासह प्रविष्ट करणे. ग्राह्यत्वाचे कारण– (नवभारत जून १९५९. पृ. ५८, ५९, ६० व आक्टोबर १९६३.)

नि – ७   अ० ३ – २६५.

इंद्रियें– मनबुद्धीचां ठाईं ।
एयाचें बिढार असें पाहीं ।
म्हणौनि ज्ञान देहीचां देहीं ।
आवरिलें असें ॥ २६५ ॥

अ० ३ राज० पृ. ९५ मुद्रित क्रमांक २६२ च्या खाली वरील ओवी २६५ क्रमांकासह प्रविष्ट करणे. ग्राह्यत्वाचे कारण– नवभारत जून १९५९ पृ. ५८, ५९–६०

नि – ८   अ० ३ – २७०

शरीरा इंद्रियें पर ।
म्हणिपती साचार ।
तयां मन जें व्यापार ।
प्रवृत्तीचा चाळी ॥ २७० ॥

नि – ९   अ० ३ – २७१

तया मना पर बुद्धि ।
बुद्धीसी आत्मा अवधी ।
एवं सर्वांसी सुधी ।
तोचि पर ॥ २७१ ॥

नि – १०   अ० ३ – २७२

तया बुद्धिपरा आत्मेया ।
जाणौनिया धनंजया ।
तेथ निश्चल होउनी– एयां ।
दुष्टां जीणें ॥ २७२ ॥

अ० ३, राज० पृ० ९६ मुद्रित क्रमांक २६६ च्या खाली वरील, नि– ८, ९, १० या ओव्या २७०, २७१, २७२ या नवीन क्रमांकानी घेणे.

पहा- नवभारत, जून. १९५९ पृ. ५८. ५९, ६०.

| ओव्या | राज० | भिडे | दांडेकर |
|---|---|---|---|
| मूळ ओ. | २७१ | २७६ | २७६ |
| ऋण * | | – ३ (खाली पहा) | – ३ (खाली पहा) |
| अधिक | + ६ | + ४ | + ४ |
| नि – | ५, ६, ७ ८, ९, १० | ७, ८, ९, १० | ७, ८, ९, १० |
| एकूण | २७७ | २७७ | २७७ |

* भिडे – १६३, १७६, २०० = ३ ओ० त्याज्य
दांडे० – १६३, १७६, २०१ = ओ. त्याज्य
तृतीयाध्यायाअखेर – ९२७ ओव्या.

## अध्याय ४ था

नि० – ११   अ. ४ – १८२

ऐसें जें पवित्र ज्ञान ।
तेणें निजकर्में चोखाळून ।
समाधिसेजें मन ।
पहुडें जेयाचें ॥ १८२ ॥

नि० – १२   अ० ४ – १८३

तेयां तें यथाकाळीं ।
स्वसत्ता तें माळ घाली ।
नातरी सांडौनि दुवाली ।
तोचि होय ॥ १८३ ॥ अ० ४ था ॥

अ० ४, राज० पृ. ११६ मुद्रित ओवी क्र. १८१ च्या खाली नि. – ११, १२ या १८२, १८३ क्रमांकाने घेणे. पहा -- नवभा० जून. १९५९ पृ. ६०

नि० – १३ अ. ४ – २१२
ते कथेची संगति ।
भावाची संपत्ति ।
रसाची उन्नति ।
म्हणिपेल मुढां ॥ २१२ ॥

अ० ४ राज० पृ. ११९ मुद्रित क्र. २०९ खाली ही वरील नि -- १३ ओ० २१२ क्रमांकाने घेणे.

पहा – नवभा० जून १९५९ पृ. ६०
राज० – नि. ११, १२, १३ अधिक
भिडे नि – १२, १३ + ; ओ. ८ उणे
दांडे. नि. १२, १३ + ; ओ. ८, १२५, उणे

| ओव्या | राज० | भिडे | दांडे० |
|---|---|---|---|
| मूळ ओ. | २२२ | २२४ | २२५ |
| अधिक | + ३ | + २ | + २ |
| उणे | | – १ (क्र ८) | – २ क्र८, १२५ |
| एकूण | २२५ | २२५ | २२५ |

| | |
|---|---|
| मागील संख्या | ९२७ |
| ४ था अध्याय | २२५ |
| ४ था अ० अखेर | ११५२ |

## अध्याय ५ वा

नि – १४ अ ५ – १७९
श्रीकृष्ण अर्जुनासी संगु ।
न सांडौनि सांघैल योगु ।
तो व्यक्त करूं प्रसंगु ।
म्हणे निवृत्तिदासु ॥ १७९ ॥

अ० ५ राज. पृ. १४० मुद्रित क्रमांक १७८ च्या खाली वरील नि – १४ वी १७९ क्रमांकाने घेणे.

पहाः नवभा० जून १९५९ पृ. ६०

| ओ. | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | १७८ | १८० | १८० |
| अधिक | + १ | | |
| उणे (क्र. ८७) | | –१ | –१ |
| एकूण | १७९ | १७९ | १७९ |

| | |
|---|---|
| मागील | ११५२ |
| ५ वा | १७९ |
| एकंदर ५ वा अखेर | (१३३१) |

## अध्याय ६ वा.

नि–१५ अ. ६–३६८
जेयापरतें आणिक नाहीं ।
जेयातें इंद्रियें नेणतीं कहीं ।
तें आपणचि आपुलां ठायीं ।
होओनि ठाके ॥ ३६८ ॥

अ० ६ राज० पृ. १७४ मुद्रित क्रमांक ३६७ च्या खाली वरील नि. १५ ची ३६८ क्रमांकासह प्रविष्ट करणे, ग्राह्यत्वाचे कारण– पहा. नवभा. जुलै १९५९ पृ. ३३

नि–१६ अ० ६–४४३
हा अंतरावो अवचितां ।
कां वोढवला भगवंता ।
दिवि भोग भोगितां ।
अनुतापी नित्य ॥ ४४३ ॥

अ० राज० पृ. १८३ मुद्रित क्रमांक ४४१ च्या खाली वरील नं. १६ ही ओवी ४४३ क्रमांकासह प्रविष्ट करावी. ग्राह्यत्वाचे कारण– पहा. नवभा. जुलै १९५९ पृ. ३३

नि– १७ अ० ६–४८५
मग तेयां आम्हां प्रीतीचें ।
स्वरूप बोलीं निर्वचे ।
ऐसें नव्हे गा तो साचें ।
सुभद्रापती ॥ ४८५ ॥

अ० ६ राज० पृ. १८७ मुद्रित क्रमांक ४८२ ओवीच्या खाली, वरील नं. १७, ४८५ क्रमांकाने प्रविष्ट करावी.

ग्राह्यत्वाचे कारण– पहा नवभा. जुलै १९५९ पृ. ३३

| ओ. | राज० | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ४९४ | ४९७ | ४९७ |
| अधिक | +३ | | |
| एकूण | ४९७ | ४९७ | ४९७ |

अ० ६ अखेर ओवीसंख्या १८२८







## अध्याय ७ वा

नि–१८ अ. ७–८२

येथ एक नवलावो ।
जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो ।
होये तें ऐक ॥ ८२ ॥

अ० ७ राज० पृ. १९७ मुद्रित क्रमांक ७९ च्यां खाली, वरील नं. १८ हा क्र. ८२ सह प्रविष्ट करावा.

भिडे- दांडे– ओ० ३२, ६७, १४४, १६३ या त्याज्य.

विवेचन- पहा. नवभारत–जुलै १९५९ पृ. ३३, ३४

| ओव्या | राज. | भिडे | दांडेकर |
|---|---|---|---|
| मूळ ओव्या | २०५ | २१० | २१० |
| अधिक | + १ | + ० | + ० |
| ऋण | | – ४ | – ४ |
| (वर पहा) | | | |
| एकूण | २०६ | २०६ | २०६ |

अ० ७ अखेर ओवी संख्या २०३४.

## अध्याय ८ वा

नि– १९ अ० ८–९५

परी मनाचेनि स्थैर्यें धरिला ।
भक्तीचिया भावना भरला ।
योगबळें आवरिला ।
सज्ज होऊनि ॥ ९५ ॥

अ० ८ राज० पृ. २२० मुद्रित ओवी क्र. ९४ च्या खाली वरील नि– १९ ही क्रमांकाने घेणे.

पहा नवभारत, जुलै १९५९ पृ. ३४ भिडे, दांडेकर– क्र. ९ त्यागावी.

| ओ. | राज. | भिडे. | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | २६९ | २७५ | २७१ |
| अधिक | +१ | | |
| ऋण (क्र. ९) | | –१ | –१ |
| | २७० | २७० | २७० |

८ व्या अध्या० अखेर ओव्या २३०४.

## अध्याय ९ वा

नि– २० अध्या० ९–५४

एकोत्तरेयाचिया वाढी ।
जे जळतीये आगीं घालिती उडी ।
तें अनायासें स्वर्गोडी ।
सांडिती केविं ॥ ५४ ॥

अ० ९ वा. राज० पृ. २४२ मुद्रित क्र. ५३ च्या खाली, वरील नं. २० ही ५४ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

पहा– नवभारत. जुलै. १९५९ पृ. ३४.

नि– २१ अ० ९–२९६

अग्निकाष्ठें खाये ।
तें काष्ठचि अग्नि होये ।
तेंवि मरतें मारितें पाहें ।
स्वरूप माझें ॥ २९६ ॥

अ० ९ वा राज० पृ. २६४ मुद्रित क्रमांक २९४ च्या खाली– वरील नं. २१ वी ओवी २९६ क्रमांकासह प्रविष्ट करावी.

ग्राह्यत्वाचे कारण– पहाः नवभारत जुलै १९५९ पृ. ३४,३५,३६

भिडे. दांडे– २२८,३३१,४९९ हे त्यांचे क्रमांक– त्याज्य (नवभा.)

| ओ. | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ५३० | ५३५ | ५३५ |
| अधिक | +२ | – | – |
| उणे (वर पहा) | | –३ | –३ |
| एकूण | ५३२ | ५३२ | ५३२ |

नवव्या अ० अखेर २८३६ ओव्या.

## अध्याय १० वा

(पहा– नवभारत जुलै १९५९ पृ. ३६,३७,३८)

नि– २२ अ० १०–२२;

तैसें एकैक देवाचें करणें ।
तें अपार बोलों केंवि मी जाणें ।
तऱ्हीं अनुवादलों धीटपणें ।
तें उपसाहिजो जी ॥ २२ ॥

अ० १० राज० पृ. २८९ मुद्रित २१ व्या ओवीच्या खाली ही वरील नं. २२ वी क्र. २२ सह प्रविष्ट करणे.

नि- २३ अ० १०-७५

मी आदीसि परु।
सकळलोकमहेश्वरु।
ऐसिया मातें जो नरु।
यापरी जाणें ॥ ७५ ॥

अध्या० १० राज० पृ. २९४ मुद्रित ७३ वी च्या खाली- ही वरील नि- २३ वी ७५ क्रमांकासह घालणे. पुढील नि- २४,२५,२६,२७,२८,२९,३०,३१,३२, ३३,३४,३५,३६ या १३ ओव्या राज-अ० १०- पृ० २९८ वरील मुद्रित १०६ क्रमांकाखाली- १०९, ११०, १११, ११२,११३, ११४, ११५, ११६,११७, ११८,११९,१२०,१२१ या क्रमांकांनी प्रविष्ट करणे.

नि-२४ अ० १०-१०९

कां जे ऐसें किरीटी।
मातें भजे जो अभेदां दिठी।
तयाचिये भजनाचिये नाटीं।
सूती मज ॥ १०९ ॥

नि-२५ अ० १०-११०

म्हणौउनि अभेदें जो भक्तीयोगु।
तेथ शंका नाहीं नये खंगु।
करितां ठेला तरी चांगु।
तें सांगितलें षष्ठीं ॥ ११० ॥

नि-२६ अ० १०-१११

तोचि अभेदु कैसा।
हे जाणावेया मानसा।
साद जाली तरी परियेसा।
बोलिजेल ॥ १११ ॥

नि-२७ अ० १०-११२

तरी मीचि एक सर्वा।
या जगा जन्म पांडवा।
आणि मजचिपासौनि आघवा।
निर्वाहो यांचा ॥ ११२ ॥

नि-२८ अ. १०-११३

कल्लोळमाळा अनेगा।
जन्म जळींचि पैं गा।
आणि तयां जळचि आश्रयो तरंगा।
जीवनही जळ ॥ ११३ ॥

नि-२९ अ. १०-११४

ऐसे आघवांचि ठायीं।
तया जळचि जैंवि पाही।
तैसा मी वांचौनि नाहीं।
विश्वीं इयें ॥ ११४ ॥

नि-३० अ. १०-११५

ऐसिया व्यापका मातें।
मानूनि जे भजती भलतेथे।
परी साचोकारें उदितें।
प्रेमभावें ॥ ११५ ॥

नि-३१ अ. १०-११६

देशकाळ वर्तमान।
आघवें मजसीं करौनि अभिन्न।
जैसा वायु होओनि गगन।
गगनींचि विचरे ॥ ११६ ॥

नि-३२ अ. १०-११७

ऐसेनि जे निजज्ञानीं।
खेळत सुखें त्रिभुवनीं।
जगद्रूपा मनीं।
सांठवोनि मातें ॥ ११७ ॥

नि-३३ अ. १०-११८

चित्तें मीचि जाले।
मियांची प्राणें धाले।
जीवों मरों विसरले।
बोधाचिया भुली ॥ ११८ ॥

नि-३४ अ. १०-११९

मग तया बोधाचेनि माजें।
नाचती संवादसुखाचीं भोजें।
आतां एकमेकां घेपे दीजे।
बोधचि वरी ॥ ११९ ॥

नि-३५ अ० १०-१२०

जैशीं जवळिकेंचीं सरोवरें।
उचंबळलिया कालवती परस्परें।
मग तरंगासी धवळारें।
तरंगचि होती ॥ १२० ॥

नि-३६ अ. १०-१२१

तैसी येरयेरांचिये मिळणी।
पडत आनंदकल्लोळांची वेणी।
तेथ बोध बोधांचीं लेणीं।
बोधेंचि मिरवी ॥ १२१ ॥



अनुक्रमणिका

नि—३७ अ. १०—१९३

तया पावळेयाही येतुलेवरी ।
गोडियेची आथि थोरी ।
मग हें तंव अवधारीं ।
परमामृत साचें ॥ १९३ ॥

नि–३८ अ. १०—२०९

अंगींचिया रोमा किती ।
जेयाचिया तेयासि न गणवती ।
तैसिया माझिया विभूती ।
असंख्य मज ॥ २०९ ॥

अ. १०, राज० पृ. ३०८, मुद्रित ओ. १९२ क्रमांकाखाली ही वरील नं. ३८ ओ० २०९ क्रमांकाने घालणे. पहा नवभारत जुलै १९५९ पृ. ३७.

नि—३९ अ० १०–२१९

याहीवरी त्या विभूती ।
सांगणें ठेलें तुजप्रती ।
सांघैन म्हणितलें तुज प्रीति ।
त्या प्रधाना आइकें ॥ २१९ ॥

अ. १० राज० पृ. ३०९, मुद्रित २०१ क्रमांकाखाली ही वरील नं. ३९ वी ओवी २१९ क्रमांकाने घालणे. पहा–नवभारत जुलै १९५९ पृ. ३७

नि—४० अ० १०—२६९

मेरुमंदरादिकीं सर्वी ।
सहित पृथ्वीतें विरवी ।
जो एकार्णवातेंही जिरवी ।
जेथिंचा तेथें ॥ २६९ ॥

अ० १० राज. पृ. ३१५, मुद्रित २५० क्र० खालीं ही वरील नं. ४० वी ओवी २६९ क्रमांकाने घ्यावी. पहा– नवभारत जुलै १९५९ पृ. ३७–३८.

नि–४१ अ० १०—२७५

आणि तें गा मीं वाचा ।
जें सुवासनीं न्यायाचां ।
आरूढौनि विवेकाचां ।
मार्गीं चाले ॥ २७५ ॥

नि–४२ अ. १०—२७६

देखिलेनि पदार्थें
जे आठवूनि दे मातें ।
स्मृतिही पैं एथें ।
त्रिशुद्धी मी ॥ २७६ ॥

अ. १०. राज० पृ. ३१६, मुद्रित २५५ क्र० खाली ही वरील नं. ४१ ओवी २७५ क्रमांकाने घ्यावी. पहा नवभारत जुलै १९५९ पृ. ३७–३८, या २७५ च्याच खाली नि–४२ ही ओवी २७६ क्रमांकाने घ्यावी.

नि–४३ अ० १०—३१९

तो तूं परब्रह्मचि असकें ।
मज दैवें दिधलासि हस्तोदकें ।
तरी आतां भेदु कायसा कें ।
देखावा कवणे ॥ ३१९ ॥

अ. १०. राज० पृ. ३२० मुद्रित २९७ क्रमांकाखाली ही वरील नं. ४३ वी ओवी ३१९ क्रमांकाने घ्यावी.

या ओवीकडे लक्ष द्यावे.

नि– ४४ अ० १० – १६३

कृष्णवाक्य संवादे ।
फूली आलें मकरंदें ।
तें फूल विनोदें ।
दीन्हले मज ॥ १६३ ॥ रा. भि. दा

ही ओवी भिडे व दांडेकर यांच्या प्रतीत १६३ या क्रमांकाने प्रविष्ट करावी.

भिडे, दांडेकर प्रतीतील– ११८, १५९, २३३, २९४ या चार ओव्या त्याज्य.

व

नि– ४४ म्हणजे क्र० १६३ ही ओवी त्या दोन्ही प्रतीत ग्राह्य.

| ओ० | राज | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ३१० | ३३५ | ३३५ |
| अधिक | +२२ | — | — |
| अधिक ( नि ४४ ) | — | +१ | +१ |
| उणे ( वर पहा ) | — | –४ | –४ |
| एकुण | ३३२ | ३३२ | ३३२ |

१० व्या अध्या० अखेर– ३१६८.

## अध्याय ११ वा.

नि– ४५ अ. ११–१७८

अक्षरें नव्हतीं देखा ।
ब्रह्मसाम्राज्यदीपिका ।
अर्जुनालागीं चित्कळिका ।
उजळलिया कृष्णें ॥ १७८ ॥

अ० ११, राज० पृ. ३४० मुद्रित क्रमांक ७७








खाली वरील नं. ४५ वी ओवी १७८ क्रमांकाने घेणे.
पहा– नवभारत, जुलै, १९५९ पृ. ३८, ३९.

नि– ४६ अ० ११–१९५

प्रथम स्वरूपसमाधान।
पावोनि ठेला अर्जुन।
सर्वेचि उघडी लोचन।
तंव विश्वरूप देखें ॥ १९५ ॥

अ० ११, राज० पृ. ३४१, मुद्रित क्र. १९३ च्या खाली वरील नं. ४६ वी ओवी १९५ क्रमांकाने घेणे. (पहा– नवभा. जुलै, १९५९. पृ. ३८–३९)

नि– ४७ अ० ११ – १९६

इहींचि दोहीं डोळां।
पाहावें विश्वरूपा सकळा।
तोहि श्रीकृष्णें सोहळा।
पुरविला ऐसा ॥ १९६ ॥

अ. ११, राज० पृ. ३४१ वरील मुद्रित १९३ ओवीच्या खाली घातलेल्या १९५ क्र० खालीच ही वरील नि– ४७ ओ– १९६ या क्रमांकाने घेणे.

पहा– नवभारत, जुलै. १९५९. पृ. ३८–३९.

नि– ४८ अ० ११ – २८४.

नाना पृथक् मूर्ती तिया द्रुमवेली।
तुझां स्वरूपमहाचळीं।
दिव्यालंकारफुलीं फळीं।
सासिन्नलिया ॥ २८४ ॥

अ० ११ राज० पृ. ३४९ मुद्रित २७९ क्रमांकाखाली वरील नं. ४८ वी ओवी २८४ क्रमांकाने घ्यावी.
पहा– नवभा० जुलै, १९५९ पृ. ३८, ३९.

नि– ४९ अ० ११–४४४

जी तुज येकाची आख्या।
मिया जरी बोलावी व्याख्या।
तरी वेदासीहि संख्या।
न कळेचि तुझी ॥ ४४४ ॥

अ० ११ राज० पृ. ३६६. मुद्रित ४३९ च्या खाली वरील नं. ४९ वी ओवी ४४४ क्रमांकाने घ्यावी.
पहा– नवभारत जुलै १९५९ पृष्ठ ३८, ३९.

नि–५० अ. ११–५२५

पाहतां पाहतां प्रांतें।
समाधान पावे चित्तें।
आणि पुढती म्हणे नमस्ते।
नमस्ते प्रभो ॥ ५२५ ॥

अ. ११ राज० पृ. ३७५ मुद्रित ५१९ च्या खाली वरील नं. ५० वी ओवी ५२५ क्रमांकानें घ्यावी. पहा – वरील नवभारत, तीच पृष्ठें.

नि–५१ अ. ११–५४१

उभा माझिये पाठीसीं।
म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी।
सन्मुख विन्मुख जगेंसीं।
न घडे तुज ॥ ५३१ ॥

अ. ११ राज० पृ. ३७५ मुद्रित ५२४ च्या खाली वरील नं. ५१ वी ओवी ५३१ क्रमांकाने घ्यावी.
जुलै १९५९ नवभारत

भिडे, दांडेकर प्रतीतील त्याज्य ओव्या क्र० २१५, ५७३, ५७४, ५७५ = ४
पहा–नवभारत जुलै. १९५९

---

| ओ. | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ६९८ | ७०८ | ७०८ |
| अधिक | +७ | +१ | +१ |
| ऋण (वरपहा) | – | –४ | –४ |
| एकूण | ७०५ | ७०५ | ७०५ |

—०—

## अध्याय १२ वा

नि–५२ अ. १२– १२८

आणि जेणें जेणें वेळें।
घडतीं कर्में सकळें।
तेयांचीं तियें फळें।
त्यजितु जाय ॥ १२८ ॥

अ. १२ राज. पृ ४०७, मुद्रित ओ. १२७ च्या खाली वरील नं. ५२ ओ. १२८ क्रमांकाने घेणे.
(पहा नवभारत – आगस्ट १९५९).

नि–५३ अ. १२– २१२

आघवाचि आकाशस्थिति।
जर्वि वायूसि नित्य वसति।
तेवीं जगचि विश्रांति।
स्थान जया ॥ २१२ ॥







अ. १२ राज पृ. ४१५ ओ. २१० च्या खाली वरील नं. ५३ ओ. २१२ क्रमांकाने घ्यावी.

नवभारत आगस्ट १९५९

मिडे, दांडेकर – क्र. २३३ त्याज्य

| ओ. | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | २४४ | २४७ | २४७ |
| अधिक | + २ | — | — |
| उणे क्र. (२३३) – | | – १ | – १ |
| एकूण | २४६ | २४६ | २४६ |

## अध्याय १३ वा

नि - ५४ अ. १३ – १७२

जेयाचेनि जालेपणें।
पांगुळ होइजे प्राणें।
जेयाचेनि विंदाणें।
जग हें चेष्टे ॥ १७२॥

अ. १३ राज. पृ. ४३४ मुद्रित क्र. १७२ च्या खाली, ही नि. ५४ वी १७२ याच क्रमांकाने प्रविष्ट करावी.

राज० पृ. ४३४ वरील १७२ वी ओवी ही, मूळ ६ वी गाळली म्हणजे, १७१ क्रमांकाचीच होते व तिच्याखाली वरील १७२ वी नेमकी बसते.

राज० पृ. ४३१ वरील मुद्रित १२९ क्रमांकाची ओवी १२८ होते. आता ही १२८ व १७२ या दोहोत पहिली दोन चरणे सारखीच आहेत तरी १२८ तील ३ रे व ४ थे चरण व १७२ तील ३ रे व ४ थे चरण अगदीच भिन्न असून त्या त्या ठिकाणी संदर्भोचित आहे. पुनरुक्त नाही. म्हणून ती विचारपूर्वकच प्रविष्ट केली आहे.

नि– ५५ अ० १३–४१८

मीच्चि होईन सागळा।
करूं सुईन गुळळा।
सांडिती तो नेपाळा।
पडिघां मीच्चि ॥ ४१८॥

अ० १३ राज० पृ. ४५५ मुद्रित ओवी ४१७ च्या खाली वरील नं. ५५ ओवी ४१८ क्रमांकाने घेणे.

पहा– नवभारत आगस्ट १९५९.

नि– ५६ अ० १३–८२४

जेया जनपदीं सुख।
गजव्रजेचें कवतिक।
वानूं आवडे लौकिके।
तोहि तोचि ॥ ८२४ ॥

अ० १३ राज० पृ. ४९० मुद्रित ओ. ८२२ च्या खाली वरील नं. ५६ वी ओवी ८२४ क्रमांकाने दाखल करावी.

पहा– नवभारत आगस्ट १९५९.

नि– ५७ अ० १३– ८३७

आयुष्येंवीण लक्षणें।
सिसेंवीण अळंकरणें।
वोहरेंवीण वाधावणें।
तो विटंबु गा ॥ ८३७ ॥

अ० १३, राज० पृ. ४९१ मुद्रित ओ० ८३४ च्या खाली वरील नं. ५७ वी ८३७ क्रमाने घ्यावी. (नवभा० ऑगस्ट १९५९)

नि– ५८ अ. १३–८७८

जें सर्वांचेया शिरावरी।
जें नित्य नांदे सर्वपरी।
ऐसिये स्थितीवरी।
विश्वमूर्धा म्हणिपे ॥ ८७८ ॥

अ० १३ राज० पृ. ४९४ मुद्रित ओ० ८७४ च्या खाली वरील नं. ५८ वी ८७८ क्रमांकाने प्रविष्ट करणे. (नव. आगस्ट १९५९).

नि– ५९ अ० १३–९२५

शून्याचें शून्यत्व गिळौनी।
गुणत्रयातें नुरवौनी।
मग आपेंआप होओनी।
राहें जें गा ॥ ९२५ ॥

अ० १३ राज. पृ. ४९९ मुद्रित ओवी ९२० च्या खाली वरील नं. ५९ ची ओवी ९२५ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

पहा– नवभारत आगस्ट १९५९

भिडे–दांडेकर– क्र. ८२ एक त्याज्य.

दांडेकर– नि– ५४ म्हणजे १७२ ग्राह्य.



अनुक्रमणिका








| ओ. | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ११६४ | ११७० | ११६९ |
| + | ६ | – | + १ (नि– ५४) |
| उणे | –१ (क्र. ६) | –१ (८२ वी) | –१ (८२ वी) |
| एकूण | ११६९ | ११६९ | ११६९ |

अ० १३ व्या अखेर एकूण ओ० सं. ५२८८.

### अध्याय १४ वा

नि– ६० अ० १४–८५

जैसें कां स्वप्नमोहा ।
तो एकाकी देखिजे बहुवा ।
तोचि पाडु आत्मेया ।
स्मरणेंवीण असे ॥ ८५ ॥

अ० १४ राज० पृ. ५३१ मुद्रित क्र. ८४ च्या खाली वरील नं. ६० ची ओवी ८५ या क्रमांकासह प्रविष्ट करणे.

ग्राह्यत्वाची चर्चा पहा– नवभारत आगस्ट १९५९.

नि–६१ अ० १४-३४०

कां शरीरांआंतील प्राणु ।
घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु ।
नाना चोहटाचा स्थाणु ।
उदासु जैसा ॥ ३४० ॥

अ० १४. राज० पृ. ५५५ मुद्रित क्र. ३३६ च्या खाली वरील नं. ६१ वी ३४० क्रमांकाने प्रविष्ट करावी.

नि–६२ अ०–१४–४०५

अगा ब्रह्म या नांवा !
अभिप्रावो मी पांडवां ।
मीचि बोलिजे आघवा ।
शब्दीं इहीं ॥ ४०५ ॥

अ० १४ राज० पृ. ५६१ मुद्रित क्र. ४०० च्या खाली वरील नं. ६२ वी ४०५ क्रमांकाने घ्यावी.

नि–६३ अ०१४–२६१

तेया सत्वसुकृतें वर्ततां ।
जरी देह सुटे पांडुसुता ।
तरी अंतीचें मतीं तत्वतां ।
तोचि होय ॥ २६१ ॥

नि–६४ अ०१४–२६२

तरी वैकुंठ कां सत्यलोक ।
जे उत्तम ब्रह्मादिक ।
अति निर्मल चोख ।
तें तो पावे ॥ २६२ ॥

अ० १४, राज० पृ. ५४८ मुद्रितक्रमांक २५९ च्या खाली वरील नं. ६३ ची ओवी २६१ क्रमांकाने घ्यावी. व या २६१ च्या खालीच खालील नं. ६४ ची २६२ क्रमांकाने घ्यावी.

भिडे, दांडेकर– क्र० २०३ त्याज्य.

| ओ. | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ४११ | ४१५ | ४१५ |
| अधिक | +५ | +२ (नि–६३।६४) | +२ (नि–६३।६४) |
| उणे क्र. (२०३) | | –१ | –१ |
| एकूण | ४१६ | ४१६ | ४१६ |

१४ व्या अध्या० अखेर ५७०४.

पहा– नवभारत– आगस्ट. १९५९.

### अध्याय १५ वा

नि — ६५ अ० १५ — १४

जैशा चंद्राअंगीचां कला ।
निववितीं लोकां सकलां ।
तैसा ज्ञानाचा ओलावा डोळां ।
देखिजैल संतीं ॥ १४ ॥

अ. १५ राज. पृ. ५६४ मुद्रित क्रमांक १३ च्या खाली ही वरील ६५ वी १४ क्रमांकाने घ्यावी.

नि – ६६ अ० १५ – ३९०

ग्रहतारा गणगती ।
अन्तराळीं ठीकती ।
परी चालीची रीती ।
ध्रुवा नाहीं ॥ ३९० ॥

अ. १५ राज. पृ. ५९८ मुद्रित क्र० ३५६ खाली नि - ६६ वी ३९० क्रमांकाने घेणे.

नि – ६७ अ० १५ – ७९

जें कार्य ना कारण ।
जेया दुजें ना एकपण ।
आपणयां जें जाण ।
आपणचि ॥ ७९ ॥

अ. १५ राज० पृ. ५७० मुद्रित क्रमांक ७७ च्या खाली ही वरील नं. ६७ वी ओवी ७९ क्रमांकाने घ्यावी.

नि – ६८ अ० १५ — १८७

मतीचे सोट वावे ।
घालिती स्फूर्तीचेनि थांवे ।
बुद्धि प्रकाश घे धांवे ।
विवेकाचेनि ॥ १८७ ॥

अ० १५ राज० पृ. ५७९ मुद्रित क्रमांक १८४ च्या खाली वरील नं. ६८ वी ओवी १८७ क्रमांकासह घ्यावी.

नि– ६९ अ० १५ – २२०

वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें ।
ययाचें अचळ मूळ असें तैसें ।
आणि तैसाचि जरी हा असे ।
साचोकारा ॥ २२० ॥

नि– ७० अ० १५–२२१

तरी कोणाचेनि संतानें ।
निपजती या उन्मूळणें ।
काय फुंकिलिया गगनें ।
जाइजेल गा ॥ २२१ ॥

अ. १५ राज. पृ. ५८२ मुद्रित क्र. २१६ च्या खाली ही वरील नं. ६९ वी ओवी २२० क्रमांकाने घ्यावी. या २२० च्या खालीच नं. ७० ची २२१ क्रमांकाने घ्यावी.

नि — ७१ अ० १५–. २२३

मृगजळाचीं गा तळीं ।
तियें दिठी दुरूनीचि न्याहाळीं ।
वांचूनि तेणें पाणियें साळी केळी ।
लाविसी काई ॥ २२३ ॥

अ० १५ राज. पृ. ५८२ मुद्रित क्र. २१७ च्या खाली वरील नं. ७१ ची ओवी २२३ क्रमांकाने घेणे.

नि – ७२ अ० १५ – २२८

वाजतें वारें निवांत ।
जंव न राहे जेथिचें तेथ ।
तंव तरंगता अनंत ।
म्हणवीचि कीं ॥ २२८ ॥

नि -- ७३ अ० १५ -- २२९

म्हणौनि सूर्य जैं हारपे ।
तैं मृगजळाभासु लोपे ।
कां प्रभा जाय दीपें ।
मालवलेनि ॥ २२९ ॥

नि – ७४ अ० १५ -- २३०

तैसें मूळ अविद्या खाये ।
तें ज्ञान जैं उभे होये ।
तैंचि ययां अंतु आहे ।
एऱ्हवीं नाहीं ॥ २३० ॥

नि–७५ अ १५–२३२

जे संसारवृक्षाचां ठायीं ।
साचोकार तंव नाहीं ।
मा नाहीं तया आदि काई ।
कोण होईल ॥ २३२ ॥

नि. ७६ अ. १५–२३३

जो साच जेथौनि उपजे ।
तयातें आदि हें साजे ।
आतां नाहींचि तो म्हणिजे ।
कोठूनियां ॥ २३३ ॥

अ. १५ राज. पृ. ५८३ मुद्रित २२२ च्या खाली ही वरील नं. ७५ वी ओवी २३२ क्रमांकाने घ्यावी. या २३२ च्याच खाली नं. ७६ वी ओवी २३३ क्रमांकाने घ्यावी.

नि—७७ अ. १५—२३५

वांझेचिया लेंका ।
कैंचि जन्मपत्रिका ।
नभीं निळी भूमिका ।
कें कल्पूं पां ॥ २३५ ॥

नि—७८ अ. १५—२३६

व्योमकुसुमाचा पांडवा ।
कवणें देठ तोडावा ।
म्हणौनि नाहीं ऐसिया भवा ।
आदि कैंचि ॥ २३६ ॥








नि- ७९ अ० १५-२३७
जैसें घटाचें नाहींपण ।
असतचि असे केलेनिवीण ।
तैसा समूळ वृक्षु जाण ।
अनादि हा ॥ २३७ ॥

नि- ८० अ० १५-२३८
अर्जुना ऐसेनि पाहीं ।
आद्यंतु ययासि नाहीं ।
माजीं स्थिती आभासे कांहीं ।
परी टवाळ ते गा ॥ २३८ ॥

नि- ८१ अ० १५-२३९
ब्रह्मगिरीहून न निगे ।
आणि समुद्रींही कीर न रिगे ।
तरी माजीं दिसे वाउगे ।
मृगांबु जैसें ॥ २३९ ॥

नि- ८२ अ० १५-२४०
तैसा आद्यंतीं कीर नाहीं ।
आणि साचहि नोहे कहीं ।
परि लटिकेपणाची नवाई ।
पडिभासे गा ॥ २४० ॥

नि- ८३ अ. १५-२४१
नानारंगी गजबजे ।
जैसें इंद्रधनुष्य देखिजे ।
तैसा नेणतया आपजे ।
आहे ऐसा ॥ २४१ ॥

नि- ८४ अ० १५-२४२
ऐसेनि स्थितीचिये वेळे ।
भुलवी अज्ञानाचे डोळे ।
लाघवी हरिमेखळे ।
लोकु जैसा ॥ २४२ ॥

नि- ८५ अ० १५-२४३
आणि नसतीच्चि श्यामिका ।
व्योमीं दिसे तैसी दिसो कां ।
तरी दिसणेंही क्षणा एका ।
होय जाय ॥ २४३ ॥

नि- ८६ अ० १५-२४४
स्वप्नींहीं मानिलें लटिकें ।
तरी निर्वाहो कां एकसारिखें ।
तेवीं आभासु हा क्षणिके ।
रीताचा गा ॥ २४४ ॥

नि. ८७
देखतां आहे आवडे ।
घेऊं जाइजे तरी नातुडे ।
जैसा ठीकु कीजे माकडें ।
जळामाजीं ॥ २४५ ॥ अ० १५

नि. ८८
तरंगभंगु सांडी पडे ।
विजूही न पुरे होडे ।
आभासासी तेणें पाडें ।
होणें जाणें गा ॥ २४६ ॥ अ० १५

नि. ८९
जैसा ग्रीष्मशेषींचा वारा ।
नेणिजे समोर कीं पाठमोरा ।
तैसी स्थिती नाहीं तरुवरा ।
भवरूपा एया ॥ २४७ ॥ अ० १५

अ. १५ राज० पृ. ५८४ मुद्रित २२३ क्र. खाली, वरील नं. ७७,७८,७९,८०,८१,८२,८३,८४,८५, ८६,८७,८८,८९ ह्या १३ ओव्या २३५,२३६,२३७, २३८,२३९,२४०,२४१,२४२, २४३, २४४, २४५, २४६,२४७ या क्रमांकानी प्रविष्ट करणे.

नि.-९० अ. १५-२६४
शरदागमींचा वारा।
जैसा केरू फेडी अंबरा।
कां उदयला रवी अंधारा।
घोंटुभरी ॥ २६४॥

नि-९१ अ. १५-२६५
नाना उपवद्ध होतां खेंवो ।
नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो ।
स्वप्रतीतिधारेचा वाहो।
करील तैसें ॥ २६५॥

अ. १५ राज० पृ. ५८६ मुद्रित २३९ च्या खाली वरील नं ९०, ९१ हे २६४, २६५ या क्रमांकानी घेणे.

नि-९२ अ. १५-२७०
हें पाहाणें ऐसें असे वीरा।
जैसा न मोडलिया विहिरा।

मग आपलिया उगमीं झरा।
भरोनि ठाके ॥ २७० ॥ अ० १५

नि.–९३ अ. १५–२७१

नातरी आटलिया अंभ।
निजबिंबीं प्रतिबिंब।
नेहटे कां नभीं नभ।
घटाभावीं ॥ २७१ ॥

नि–९४ अ. १५–२७२

ना ना इंधनांशु सरलेया।
वह्नि परते जेवीं आपणपेयां।
तैसें आपेंआप धनंजया।
न्याहाळणें जें गा ॥ २७२ ॥

नि–९५ अ. १५–२७३

जिव्हे आपली चवी चाखणें।
चक्षु निज बुबुळ देखणें।
आहे तया ऐसे निरीक्षणें।
आपुलें पैं ॥ २७३ ॥

नि–९६ अ. १५–२७४

का प्रभेसि प्रभा मिळे।
गगन गगनावरी लोळे।
नाना पाणी भरलें खोळे।
पाणियाचियें ॥ २७४ ॥

अ. १५ राज. पृ. ५८७ मुद्रित २४३ च्या खाली वरील नं. ९२, ९३, ९४, ९५, ९६ हे क्रमाने २७०, २७१, २७२, २७३, २७४ या क्रमांकानी प्रविष्ट करणे.

नि–९७ अ. १५–३०३

जैसा काढिलिया मंदराचळु।
राहे क्षीराब्धि निश्चळु।
तैसा नुठी जयां सळू।
कामोर्मीचा ॥ ३०३ ॥

नि. ९८ अ. १५–३०४

चंद्रमा कळीं धाला।
न दिसे कोणें आंगीं वोसावला।
तेवीं अपेक्षेचा अवखळा।
न पडे जेयां ॥ ३०४ ॥

अ. १५, राज. पृ. ५९० मुद्रित २७१ च्या खाली वरील नं ९७, ९८ हे ३०३, ३०४ या क्रमांकानी घेणे.

नि.–९९ अ. १५–४३३

जैसें सर्पत्वा कां दोरा।
दोरुचि मूळ धनुर्धरा।
तैसा ज्ञाना अज्ञानाचिया संसारा।
मियांचि सिद्धु ॥ ४३३ ॥

अ. १५ राज. पृ. ६०२ मुद्रित क्र. ३९८ च्या खाली वरील नं. ९९ वी ४३३ क्रमांकानी प्रविष्ट करणे.

**अ. १५**

| ओव्या | राज. | भिडे | दांडे. |
|---|---|---|---|
| मूळ | ५६५ | ५९९ | ५९८ |
| अधिक | + ३३ | | |
| नि६५।६६ | + २ | + २ | + २ |
| क्र. उणे (५१२) | | – १ | |
| एकूण | ६०० | ६०० | ६०० |

अ. १५ अखेर ओ. सं. ६३०४.

## अध्याय १६ वा

नि – १०० अध्या. १६ – ६०

आणि ज्ञानाचेनि कामाकारें।
जे रागद्वेषांसि दे थारे।
तिये आसुरियेही घोरे।
करील रूप ॥ ६० ॥

अ० १६, राज. पृ. ६२४ मुद्रित ५९ वीच्या खाली वरील नं. १०० ओवी ६० या क्रमांकाने घेणे.

नि -- १०१ अ० १६ -- १८६

आतां ईश्वरप्राप्तीलागीं।
प्रवर्तेतां ज्ञानयोगीं।
धिंवसेयाची आंगीं।
उणीव नोहे ॥ १८६ ॥

अ० १६ राज० पृ. ६३७ मुद्रित २८४ ओवीच्या खालच्या श्लोक ३ च्या खाली ही वरील नं. १०१ ओवी १८६ या क्रमांकाने घेणे.

नि—१०२ अ. १६—४१९.

पापा जेयाचा कंटाळा ।
उपजे अमंगळ अमंगळा ।
विटाळुही विटाळा ।
व्हिे जया ॥ ४१९ ॥

अ० १६—राज० पृ. ६५९ मुद्रित क्र० ४१६ च्या खाली वरील नं. १०२ ही ओवी ४१९ या क्रमाकांने घेणे.

पहा— नवभारत आगस्ट १९५९—संपूर्ण १५ वा अ.

| ओ. | राज. | भिडे | दांडेकर |
|---|---|---|---|
| मूळ | ४७० | ४७३ | ४७३ |
| अधिक | +३ | — | — |
| एकूण | ४७३ | ४७३ | ४७३ |

१६ व्या अ० अखेर ६७७७.

## अध्याय १७ वा

नि—१०३ अ. १७—२९८

तेथ विभांडुनियां जग ।
आणिले पदार्थ अनेग ।
तेणें घालूं लागे मातंग ।
गवादीसी ॥ २९८ ॥

अ. १७ राज० पृ. ६९४ मुद्रित २९७ च्या खाली ही नं. १०३ ची ओवी २९८ या क्रमांकाने घेणे.

नि—१०४ अ. १७—३२९

उपजलिया बाळकासी ।
नांव नाहीं तयापासीं ।
ठेविलेनि नांवेंसी ।
ओ देत उठी ॥

अ. १७ राज० पृ. ६९७ मुद्रित ३२७ च्या खाली ही नं. १०४ ची ओवी ३२९ या क्रमांकाने घेणे.

| ओ. | राज. | भिडे | दांडे |
|---|---|---|---|
| मूळ | ४३० | ४३३ | ४३३ |
| अधिक | +२ | — | — |
| उणे ( क्र. ७९ ) | | −१ | −१ |
| | ४३२ | ४३२ | ४३२ |

भिडे-दांडेकर — क्र० ७९ त्याज्य

१७ व्या अ० अखेर— ७२०९.

## अध्याय १८ वा.

नि—१०५ अ० १८—१५९

तीर्थें बाह्यमळु क्षाळे ।
कर्में अभ्यंतर उजळे ।
एवं तीर्थें जाण निर्मळें ।
सत्कर्मेंचि ॥ १५९ ॥

अ० १८ राज० पृ. ७२३ मुद्रित क्रमांक १५८ च्या खाली वरील ओवी १५९ क्रमांकाने प्रविष्ट करणे.

नि—१०६ अ. १८—८८०

येतुलाचि पांडवा ।
वैश्यातें कर्माचा मेळावा ।
हा वैश्यजातिस्वभावा- ।
आंतुला जाण ॥ ८८० ॥

अ० १८ राज० पृ. ७९० मुद्रित क्रमांक ८७८ च्या खाली वरील ८८० वी ओवी प्रविष्ट करणे.

नि—१०७ अ० १८—९३९

पैं नित्य होम देयावया ।
कां सैरा आगी सुवावया ।
फुंकितां धूम धनंजया ।
साहणें तेंचि ॥ ९३९ ॥

अ. १८ राज० पृ. ७९६ मुद्रित क्रमांक ९३७ च्या खाली वरील ओवी ९३९ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

नि—१०८ अ. १८—९६९

तैसी अबोधाचिये कुंशी ।
कर्म कर्ता कार्य ऐशी ।
त्रिपुटी असे ते जैसी ।
गाभिणी मारिली ॥ ९६९ ॥

अ. १८ राज० पृ. ७९९ मुद्रित क्रमांक ९६५ च्या खाली वरील ओवी ९६९ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

नि—१०९ अ० १८—१२७३

तरी नित्य मुक्त अव्ययो ।
तूं आहासी तें होऊनी वावों ।
देहसंबंधाचा घावो ।
वाजेल अंगीं ॥ १२७३ ॥

अ. १८ राज० पृ. ८२६ मुद्रित क्रमांक १२६८ च्या खाली वरील ओवी १२७३ क्रमांकासह प्रविष्ट करणे.












नि – ११० अ. १८–१२९३

उत्तरु वैराटींचा राजा ।
पळतां तूं कां निघालासि झुंझा ।
हा क्षात्रस्वभावो तुझा ।
जुंझवील तूंतें ॥ १२९३ ॥

अध्या० १८ राज० पृ० ८२८, मुद्रित, क्रमांक १२८७ च्या खाली वरील ओ. १२९३ क्रमांकासह प्रविष्ट करणे. ग्राह्यत्वाचे कारण – ही संपूर्ण अध्याय चर्चा पहा — नवभारत आगस्ट, १९५९.

नि–१११ अ० १८–१५३८

अथवा माझारीं ।
गेले सांडिविखुरी ।
किंवा उपेक्षेवरी ।
वाळूनि सांडिले ॥ १५३८ ॥

नि–११२ अ० १८–१५३९

जैसें आम्हीं सांगितलें ।
तैसेंचि हृदयीं पावलें ।
तरी सांग पां वहिलें ।
पुसेन तें मी ॥ १५३९ ॥

अ० १८ राज० पृ. ८५१, मुद्रित ओ० क्रमांक १५३१ च्या खाली वरील ओव्या ( दोन ) १५३८, १५३९ क्रमांकासह प्रविष्ट कराव्या.

नि–११३ अ० १८–१५७१

तेणें म्हणतसे संजयो ।
बाप कृपानिधी रावो ।
तो आपला मनोभावो ।
अर्जुनेसी केला ॥ १५७१ ॥

अ० १८ राज० पृ. ८५४ मुद्रित ओ० क्रमांक १५६२ च्या खाली वरील ओवी १५७१ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

भिडे, दांडे. प्रतीतील १५७१ व १५७२ या क्रमांकात १५७१ ही वरील ओवी घालणे.

नि–११४ अ० १८ - १५९१

नाना अर्कापुढें अर्कु ।
उदयलिया आणिकु ।
कोण म्हणे प्रकाशकु ।
प्रकाश्य कवण ॥ १५९१ ॥

अ० १८ राज० पृ० ८५६ मुद्रित क्रमांक १५८१ च्या खाली वरील ओवी १५९१ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

नि– ११५ अ० १८– १५९३

जी मिळतां दोन्ही उदकें ।
माजी लवण वारूं ठाके ।
कीं तयासींही निमिखें ।
तेंचि होय ॥ १५९३

अ० १८ राज० पृ. ८५६ मुद्रित क्रमांक १५८२ च्या खाली वरील ओवी १५९३ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

नि– ११६ अ० १८–१६०२

ऐकतांचि ते गोठी ।
ब्रह्मत्वाची पडिली मिठी ।
मी तूं पणेशीं दिठी ।
विरौनि गेली ॥ १६०२ ॥

अ० १८ राज० पृ. ८५७ मुद्रित क्रमांक १५९० च्या खाली वरील ओवी १६०२ क्रमांकासह प्रविष्ट करणे.

ग्राह्यत्वाचे कारण–पहा नवभारत आगस्ट १९५९

## अ० १८

भिडे, दांडे. प्रतीतील त्याज्य क्रमांक– ४८,३८३, १२९६, १४२१, १५४७, १५४९, १५६३, १५७२, १६४०, १६४१ भिडे, दांडे. प्रतीत प्रविष्ट करावयाची नवीन ओवी १५७१– या क्रमांकातील ११३ व्या शीर्षकक्रमांकात दिलेली.

सारांश

| | | |
|---|---|---|
| भिडे, दांडे | ऋण | –१० |
| ” | अधिक | +१ |

राज० प्रतीप्रमाणेच “ शके बाराशते बारोत्तरें ”– ही ओवी भिडे–दांडेकर या प्रतीत वगळली आहे.

| ओव्या | राज. | भिडे | दांडेकर |
|---|---|---|---|
| मूळ ओ. | १७८८ | १८०९ | १८०९ |
| ऋण | | – १० | – १० |
| अधिक | + १२ | + १ (नि–११३) | + १ (नि–११३) |
| एकूण | १८०० | १८०० | १८०० |

भिडे व दांडेकर प्रतीतील १८१० वी अंतिम ओवी ज्ञानदेवीनंतरची आहे म्हणून ती सोडून अ. १८ ची








ओवीसंख्या १८०९ धरिली आहे. अ. १८ अखेर सर्वत्र एकंदर ओवीसंख्या--

| | |
|---|---|
| अ. १७ अखेर | ७२०९ |
| १८ | १८०० |
| एकंदर ओवी संख्या | ९००९ |

याप्रमाणे राज. प्रतीतून निसटलेल्या ११३ ओव्यांचे साधार व प्रगट प्रदर्शन वाचकांसमोर मांडिले आहे. ते ज्ञानेश्वरचरणी अर्पून मी निर्लिप्त होतो. गुणदोष महाराजांनाच माहीत कारण मी गुरुसूत्राधीन अर्थात् —

यालागीं मीं गुणदोष ।
विषीं क्षमाविना विशेष ।
जे मी संजात ग्रंथलो देख ।
आचार्ये कीं ॥ १८ । १५६०

संजात = तटस्थ, निर्लिप्त, स्वयंभु – असा अर्थ जाणावा. अ० १२।११९ या ओवीतही नेमका हाच अर्थ आहे. इतरांनी तेथे दिलेले– सार्थक वगैरे अर्थ– अप्रौढ व अनुपयुक्त जाणावे. ते चूक आहेत.

चालो परस्पर विचारप्रथा म्हणुनि केलें परीक्षण मनें ।
टीपांत बालिश, वृथा दीर्घ विस्तर, अनर्थावह प्रवचनें ।
वाचोनियां गुरु चुका दाविणें मजसि साधार भाग पडलें ।
तों काय कोप उपजे, नाभिनंदन न आभारही प्रकटिले ॥ १ ॥

व्यासंगमग्न, चिरपारायणप्रपट्ठ संपन्नधीबलयुतें ।
विद्वद्‌गणें सुचिरचर्चापथें निवड केल्याविणे निजमतें ।
ज्ञानेश्वरी विशद होईल काय कधिं पंचांगुलेंचि उचले ।
एकांगुलें न च कधीं "ग्रास" तेंवि बुधवृंदेंचि अर्थ उकले ॥ २ ॥

जय हिंद !!










प्रा. पंडित आवळीकर

# राजा बाघसवार

हिंदुधर्म आणि इस्लाम यांचा परस्परांवर पडलेला प्रभाव, परस्परांत निर्माण झालेला अनुबंध, दैवतांच्या किंवा सत्पुरुषांच्या नावांची व त्यांच्या विषयींच्या कथांची झालेली रूपांतरे, विशेषतः नाथ व दत्त या संप्रदायांशी आलेला अिस्लामचा संबंध हे सर्व अभ्यसनीय आहे. यावनी राजवटीमध्ये या दोन धर्मांचा इतका निकट संबंध येणे स्वाभाविक होते. या संबंधातून निर्माण झालेल्या अनुबंधामुळे दुसऱ्या धर्मातील दैवताला व सत्पुरुषाला 'आपलासा' करून घेण्याची, त्याला आपल्या परंपरेचे नांव देण्याची व त्याच्याशी आपल्याकडील काही कथा निगडित करण्याची प्रवृत्ति वाढीस लागली. राजा बाघसवार हे याच प्रवृत्तीचे निदर्शक उदाहरण आहे.

धारवाड जिल्ह्यात नवलगुंदपासून तीन मैल अंतरावर यमनूर नावाचे गाव आहे. तेथे राजा बाघसवार नावाच्या मुसलमान संताची प्रतिवर्षी फाल्गुन वद्य पंचमीस जत्रा भरते. धारवाड जिल्ह्याच्या गॅझेटियरमध्ये यासंबंधी माहिती मिळते ती अशी : राजा बाघसवार हा कलबुर्गा येथे होऊन गेला. त्याचे खरे नांव शाह मीर अब्दुल रजाक कादी. इ. स. १६९० च्या सुमारास दोन प्रसिद्ध संत होऊन गेले. विजापूर येथे ख्वाजा बंदे नवाज व कलबुर्गा येथे शाह मीर अब्दुल रजाक कादी. कादी यांनी पुष्कळ चमत्कार करून दाखविले. ते हातात सापाचा चाबूक घेऊन वाघावर बसत म्हणून त्यांना राजा बाघसवार असे नाव पडले. एकदा ते ख्वाजा बंदेनवाझना भेटावयास विजापुरास आले. ते जवळ येत असताना ख्वाजांच्या अद्‌भुत सामर्थ्य असलेल्या सातवर्षांच्या नातवाने एका जुन्या भिंतीवर उडी मारली व ती चालवून तो कादींना भेटावयास गेला. भिंत चालवू शकणारी ही शक्ति पाहून कादी ख्वाजांना न भेटता तसेच कलबुर्ग्याला परतले व दुःखाने मरण पावले. ख्वाजांनी आपल्या नातवालाही कादींच्या मृत्यूला कारण झाल्याबद्दल शाप दिल्याने तोही मृत्यू पावला. तेव्हापासून राजा बाघसवारांची सर्वत्र प्रसिद्धि झाली व पुष्कळ ठिकाणी त्यांची स्थाने निर्माण झाली.

यमनूर येथील स्थान कोरेगावच्या बेत्रोजी नावाच्या मराठा माणसामुळे निर्माण झाले. बेत्रोजी हा बाघसवारांचा भक्त होता एकदा स्वप्नात बाघसवारांनी त्याला सांगितले : "तू उठल्यावर तुझ्या उशाशी तुला 'पंजे' आढळतील, ते घेऊन तू यमनूर येथे जा. तेथे तू त्यांची पूजा कर." जागा झाल्यावर बेत्रोजीला दोन पंजे दिसले. ते घेऊन तो यमनूर येथे आला. पुढे स. १७२० च्या सुमारास बेत्रोजीच्या वंशजांनी त्या ठिकाणी इमारत बांधली. हे ठिकाण (उपदंशादि) रोगांच्या निवारणासाठी प्रसिद्ध आहे.[१]

गॅझेटियरमधून मिळणारी राजा बाघसवारांसंबंधीची ही माहिती अनेकदृष्टींनी महत्त्वाची व विचारांना चालना देणारी आहे. राजा बाघसवारांची ठिकठिकाणी स्थाने (tombs) निर्माण झाली असे गॅझेटियरमध्ये म्हटले आहे. पण त्या स्थानांचा स्पष्टनिर्देश नाही. या स्थानांचा शोध घ्यावयास हवा : तसेच ही पदवी असलेले एकाहून अधिक मुसलमान संत होऊन गेले काय, याचाही विचार व्हावयास हवा.

प्रा. न. र. फाटकांचे एक विधान येथे लक्षात घेण्यासारखे आहे : "माहीसवार (मत्स्यारोही) प्रमाणे मागे सांगितलेल्या काही साधूंना 'शेरसवार' 'बाघसवार' (वाघावर बसणारे) अशा पदव्या आहेत. (ज्ञानेश्वरांच्या भेटीस जातांना चांगदेवांचे वाहन वाघ होते, या गोष्टीचे सादृश्य सदर पदव्यात दिसून

१. Bombay Gazetteer, Volume XXII, Dharwar, 1883, P. 789. येथील खाऱ्या पाण्यात अशा प्रकारचे रोग बरे करण्याचा गुण आहे असे म्हणतात.









येईल.)"[२] प्रा. फाटकांनी 'मागे सांगितलेल्या' (म्हणजे पृ. ४९ पूर्वीच्या 'लोकस्थितीचा आढावा' या प्रकरणात उल्लेखिलेल्या) कोणत्या साधूंना 'बाघ-सवार' ही पदवी होती हे स्पष्ट होत नाही. फाटकांच्या विवेचनात शाह मीर अब्दुल रजाक कादरी यांचे नाव आलेले नाही. बाघसवार या पदवीने चांगदेवांचे स्मरण होणे स्वाभाविक आहे. पण त्याहून अधिक काही आपल्या हाताशी लागण्याचा संभव आहे. प्रारंभी सूचित केलेल्या हिंदू–इस्लाम संबंधाचे काही धागेदोरे येथे सापडू शकतील.

प्रा. फाटकांच्या विधानावरून असे म्हणता येईल की, 'बाघ-सवार' नावाच्या एकाहून अधिक व्यक्ती होऊन गेल्या असाव्यात. तसेच धारवाड गॅझेटियरमध्ये म्हटल्याप्रमाणे एकाच 'बाघसवार'ची अनेक स्थाने असावीत. बाघसवारच्या दुसऱ्या एका स्थानाची माहिती देऊन मग अन्य विवेचनाकडे वळतो. कोल्हापूर जवळ रुकडी नावाचे गाव आहे. तेथेही राजे बाघ-सवार यांचे स्थान (tomb) आहे. कोल्हापूर जिल्ह्याच्या गॅझेटियरमध्ये त्यासंबंधी पुढील माहिती दिलेली आहे:- २२' × २२' × १८' आकाराचे हे मुसलमान अवलियाचे ठिकाण आहे. अवलिया 'हजरत राजे बाघसवार' या टोपण नावा (Nick-name) ने प्रसिद्ध होता. येथे बाघसवारांचे खरे नाव दिलेले नाही : कादरी हे नाव दिले गेलेले नाही. पण वाघावर बसण्यामुळे हे नाव पडले हे मात्र सांगितले आहे. रुकडी येथील रुक्मादेवी ही ग्रामदेवता तेथील लोकांना फार पीडा देत असे. सुरेपान या आपल्या एका सह–योग्याच्या सांगण्यावरून बाघसवार (जे मूळचे अरेबियातील होते) रुकडी येथे आले व त्यांनी रुक्मादेवीचे पारिपत्य करून तिच्या देवळाचे मुसल-मान स्थानात रूपांतर केले. बाघसवारांना त्यांच्या मृत्यूनंतर याचठिकाणी मध्यभागी पुरण्यात आले.[३]

यमनूर व रुकडी येथील बाघसवार एकच की भिन्न? या प्रश्नाकडे सध्या येथे न वळता बाघसवारांसंबंधीच्या एका ग्रांथिक निर्देशाकडे आधी वळतो. धुंडीसुत नरहरि मालूने बाबा चैतन्यांना 'राजबागशर' म्हणत असे पुढील ओवीत सांगितले आहे :—

कल्याणकलबुर्गी बाबा चैतन्य।
राजबागशर नाम ठेविले त्याने।
म्हणाल केले यवनकारण।
ऐसे विपरीत त्या रायें॥[४]

औरंगजेबाने हिंदु-देवस्थानांची नावे कशी बद-लली हे सांगताना हा उल्लेख आलेला आहे. 'बाग-शर' हे अशुद्ध रूप असले तरी ते 'बाघसवार' या शब्दाचेच आहे याबद्दल शंका नाही. परंतु नरहरि मालूच्या या माहितीला इतर आधार मिळतात काय, हे पाहण्यासारखे आहे. बाबा चैतन्यांना बाघसवार म्हटल्याचे आढळते काय, याचा विचार करावयास हवा.[५]

तसेच केवळ बाबा चैतन्यांचाच येथे संबंध येतो असे नाही. वडवाळसिद्ध नागेश किंवा नागनाथ, राघवचैतन्य व केशवचैतन्य यांचाही या बाघसवार प्रकरणाशी संबंध आहे. अनेक गोष्टींचे धागे येथे गुंत-लेले आहेत. ते सोडविण्याचा व नीट जोडण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

धारवाड-गॅझेटियरमध्ये ख्वाजा बंदेनवाज व कादरी ऊर्फ बाघसवार यांची दिलेली कथा हे ज्ञानेश्वर व चांगदेव यांच्या भेटीच्या कथेचे इस्लामीकरण आहे. ख्वाजांचा नातू ज्ञानेश्वरांप्रमाणेच भिंत चालवितो. 'बाघसवार' वाघावर बसून चांगदेवाप्रमाणेच ख्वाजांच्या भेटीस जातात. चांगदेवाचे इस्लामीकरण किंवा त्यांच्यासारखाच एक मुसलमान बाघसवार निर्माण होतो, याच्या मुळाशी काय आहे? चांगदेवानंतर पुष्कळ शतकांनी झालेले हजरत कादरी 'बाघसवार'

---

२. श्री एकनाथ: वाङ्मय आणि कार्य, पृ. ४९.

3. Bombay Gazetteer, Volume XXIV, Kolhapur, 1886, P. 318.

४. नवनाथभक्तिसार, अ. २३ ओ. १८०.

५. बाबा चैतन्यांना 'शेख शाहाबुद्दीन' म्हणत. त्यांचा दर्गा मान्याळ येथे आहे. कल्याण (कुलबर्गे) येथे बंदेनवाज व लाडले यांनी एक पैगंबर ठेवल्याची व त्याचे नाव 'राजे बाग सवली' असल्याची माहिती 'साबळेश्वरकर कैफियती'त मिळते. 'सवार' ऐवजी 'सवली' हा शब्द पडला असावा.



अनुक्रमणिका







या नावामुळे हिंदूंना एकदम जवळचे वाटले असले पाहिजेत. हे नाव देऊन दोन क्रिया घडल्या : ( १ ) चांगदेवांचे इस्लामीकरण आणि ( २ ) हजरत काद्रींचे हिंदूकरण. त्यामुळे उभयधर्मीयांना बाघसवार आदरणीय वाटू लागले, आपले वाटू लागले, असे म्हणता येईल. " नावात काय आहे ? " हा प्रश्न अशा ठिकाणी असा व्यर्थ ठरतो. चांगदेवांची कथा व त्यातून ' बाघसवार ' नावाची निर्मिति यांचा आणखी एक संबंध आहे. महीपतीने[६] चांगदेवासंबंधी म्हटले आहेः—

( अ ) चांगदेव मंडळीसह परिवार।
हिंदुसि दिसती वैष्णववीर।
आणि यवन राज्याच्या दृष्टीसमोर।
पीर पैगंबर भासती ॥

( आ ) तैशाच रीती चांगदेव।
हिंदूंसि भासती वैष्णव।
आणि यवनासि दिसती पैगंबर सर्व।
हेचि अपूर्व मज वाटे ॥

यावरून मुसलमानांना चांगदेवांबद्दल आत्मीयता वाटत होती हे ध्यानात येते. महीपतीने वरील ओव्यात निर्देशिलेला चांगदेव हा प्रत्यक्ष चांगा वटेश्वर नव्हे, तर त्याचा अवतार ' ( नारायण डोहो क्षेत्रा 'तील मुधोपंताच्या पोटी ' आलेला हा चांगदेव. याच्याच चरित्रासाठी महीपतीने ' भक्तलीलामृता 'तील ६ ते १० हे अध्याय खर्ची घातले आहेत. )

चांगदेव हे ' वटेश्वर ' संबधित आहेत, तर नागेश किंवा नागनाथ हे स्वतः ' वटसिद्ध ' म्हणून प्रसिद्ध आहेत. नाथपंथाचा व सिद्धपंथाचा वटवृक्षाशी असणारा संबंध चित्य आहे. वटसिद्ध नागनाथांशी संबंध असणाऱ्या घटनांचा व व्यक्तींचा चांगा वटेश्वराशी अन्वय जोडणारे ' बाघसवार–प्रकरण ' आहे.

वडवाळसिद्ध अथवा वटसिद्ध नागनाथांना मुसलमान ' नसरुद्दीन ' म्हणून ओळखत. ' नागेशलीलामृता 'त तसा उल्लेख आहे. परंतु नसरुद्दीन या दिल्ली येथे होऊन गेलेल्या अवलियाची व नागनाथांची एकरूपता मानणे कसे अडचणीचे आहे हे श्री. वा. सी. बेंद्रे यानी स्पष्ट केले आहे. नसरुद्दीन संबंधीची श्री. बेंद्रे यांनी केलेली पुढील दोन विधाने[७] महत्त्वाची आहेत–

( अ ) परंतु ' नसरोद्दीन ' हा जरी ' गेसूदराजा 'चा गुरु असला तरी तो पूर्णपणे मुसलमान अवलिया उत्तर हिंदुस्थानात होऊन गेला. तो दक्षिणेत आलाच नाही. शिवाय तो व त्याचा शिष्य गेसूदराज चवदाव्या शतकात होऊन गेले व केशवचैतन्य व त्यांचे गुरु राघवचैतन्य सोळाव्या शतकात झाले.

( आ ) शेख नासिरुद्दीन हा दिल्लीचा सुप्रसिद्ध सूफी अवलिया होऊन गेला. मात्र हा दक्षिणेत आल्याचे कोणीही इतिहासकार अगर चरित्रकार सांगत नाहीत. इतकेच नाही तर त्याच्या चरित्रप्रसंगावरून त्याला दक्षिणेत येण्यास अवसर मिळाला असेल असे वाटत नाही.

डॉ. देवऱ्यांच्या आधारे बेंद्रे यांनी नासिरुद्दीन हे इ. स. १३५६ त पैगंबरवासी झाले असे म्हटले आहे, तर गेसूदाराजचा मृत्यू स. १४२२ मध्ये झाल्याचे सांगितले आहे. अन्यत्र गेसूदाराजांचे निधनवर्ष इ. स. १४२१ असे दिलेले आढळते.[८]

हे येथे सांगण्याचे कारण म्हणजे केशवचैतन्य व हजरत ख्वाजा बंदे नवाज ऊर्फ गेसूदाराज ( गुलबर्गा ) यांना एक समजण्याची कल्पना होय. पुन्हा राजा बाघसवार व ख्वाजा बंदेनवाज यांचा संबंध आहे.

गॅझेटियरमध्ये इ. स. १६९० च्या सुमारास ख्वाजा बंदेनवाज व हजरत काद्री ऊर्फ बाघसवार हे अनुक्रमे विजापूर व गुलबर्गा[९] येथे होऊन गेले असे सांगितले आहे. गेसूदाराज व ख्वाजा बंदेनवाज हे एकच मानण्यात मोठी अडचण काळाची आहे. त्यांचे काळ भिन्न दिसत आहेत. पण ' ख्वाजाबंदेनवाज गेसूदाराज ' ही एकच व्यक्ति आहे व ती १९६० च्या

६. भक्तलीलामृत, अ. ९ ओ. १५७ व १६०

७. तुकाराम महाराजांची गुरुपरंपरा, पृष्ठे ६८ व १०२.

८. तारीखे– आदबे– उर्दू, पृ. १६.

९. ' कलबुर्गा ' म्हणजेच ' गुलबर्गा ' होय.








सुमारास हयात नव्हती.[१०] नसरुद्दीन-गेसूदाराज यांच्याप्रमाणेच नागनाथ-केशवचैतन्य ही गुरु-शिष्यांची जोडी आहे हे खरे मानले तरी त्यामुळे—

नागनाथ = नसरुद्दीन

केशवचैतन्य = गेसूदाराज

अशी समीकरणे मांडणे शास्त्रपूत ठरणार नाही. पुन्हा केशवचैतन्यांच्या काळाचाही विचार करावयास हवा. सोळाव्या शतकात होऊन गेलेले केशवचैतन्य व चौदाव्या शतकातील गेसूदाराज एक असणे शक्य नाही हे श्री. भेंद्रे यांचे मत[११] मान्य करावे लागेल.

काळाबरोबर स्थळाचेही अवधान ठेवावयास हवे. गॅझेटियरमध्ये सांगितल्याप्रमाणे ख्वाजाबंदेनवाज यांचे निवासस्थान विजापूर हे नव्हे : ते गुलबर्ग्याचे. त्यांचा तेथे प्रसिद्ध व सुंदर दर्गा आहे. केशवचैतन्य हेही गुलबर्ग्यासच होते असा समज आहे. चैतन्यत्रयीच्या स्थानाबद्दलच्या या ओव्या[१२] महत्त्वाच्या आहेतः —

केशवचैतन्य पवित्र ।
[१३]कलबुर्गं होय स्थीर ।।
तसाच राघवचैतन्य थोर ।
अळंद गोजिरे जयाचेनी ।।
बाबाचैतन्य समर्थ ।
भीमरथीतीर निकट तेथ ।
मान्याळ नगरी विख्यात ।
सदा विचरे गुप्ततैस्थली ।।

मला वाटते, नरहरि मालूने गैरसमजुतीने बाबाचैतन्यांना गुलबर्गा येथे आणून बसविले व त्यांना 'राजबागशार' म्हटले. कदाचित् त्याचा केशवचैतन्य व बाबाचैतन्य या नावांबाबत गोंधळ झाला असावा. या दोघांपैकी कोणाला अन्य कोणी 'बाघसवार' म्हटल्याचे माझ्या वाचनात नाही. 'नागेशलीलामृता' त असा नामोल्लेख नाही. रुकडीच्या रुक्मादेवीला बाघसवारांनी शिक्षा करण्याची कथा व राघवचैतन्यांनी असुरी देवीला शासन केल्याची कथा[१४] यांच्यात साम्य असले तरी त्यामुळे बाबाचैतन्य व बाघसवार यांचा संबंध जुळत नाही.

राजा बाघसवारांच्या स्थानांचा अधिक शोध घ्यावयास हवा असे मी म्हटले. यमनूर व रुकडी येथील स्थानांचा मुख्यतः निर्देश केला, आणि काही स्थानांचा ओझरता उल्लेख करतो. हुबळी येथे बसस्टँडच्या आवारातच राजा बाघसवारांचे एक स्थान ( tomb ) आहे. तेथे दर गुरुवारी दर्शनासाठी लोकांची गर्दी होते. पूजेला मुस्लिमेतर पुजारी आहे. आर्यपंचाळ जातीच्या ओतारी नांवाच्या मराठीभाषक घराण्याकडे या स्थानाच्या पूजेचे काम असून पुजाऱ्यास 'मुजावर' असे म्हटले जाते. विद्यमान मुजावराकडे देवस्थानाबद्दल चौकशी करता असे कळले की हिंदू हे स्थान चांगदेवाचे मानतात व मुसलमान सय्यद ताजुद्दीन यांची ही कबर आहे असे समजतात, पुणे व खातून ( मिरजेजवळ– ? ) येथेहि राजा बाघसवारांची स्थाने असून तेथेही मराठा पुजारी आहेत. रायचूरजवळ निंगसूर छावणी येथेही घरात बाघसवारांची ( त्यांच्या पंजाची ) पूजा केली जाते.

राजा बाघसवारांचे पुजारी मुस्लिमेतर व मराठी भाषक ब्राह्मणेतर ज्ञातीतील आहेत ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. परंपरेने या देवस्थानाचे मूळस्वरूप 'मराठी' दिसते. चांगदेवाशी जोडला जाणारा संबंध त्यामुळेच चिंत्य वाटतो. हे देवस्थान नाथ व महानुभाव यांच्या संप्रदायाशी निगडित असावे. त्यामुळे ते मुस्लिमांचेही बनले असावे. 'राऊळ' हा शब्द येथे अनेक धागे गुंफणारा म्हणून विचारात घ्यावयास हवा. तसेच पुन्हा नागनाथांकडे धाव घ्यावयास हवी.

चांगदेव व नागनाथ यांच्या 'वटेश्वर' व 'वटसिद्ध' या शब्दातून सूचित होणाऱ्या संबंधाचा धागा प्रारंभी

---

१०. गॅझेटियरमधील कालोल्लेख चुकीचा मानावा लागेल. ख्वाजा बंदे नवाज गेसूदाराज हे उर्दूतील दख्खनमधील पहिले गद्यशैलीकार समजले जातात. 'हिदायतनामा' व 'मीराज्–उल्–आशकीन्' हे त्यांचे दोन ग्रंथ होत. त्यांच्या मृत्यूचे वर्ष हिजरी ( ८२५– 'दख्खनमे उर्दू' पृ. २७

११. तुकाराममहाराजांची गुरुपरंपरा, पृ. ६८

१२. नागेशलीलामृत, अ. २८ ओ. ३५–३६

१३. वास्तविक ओतूर येथे त्यांची समाधि आहे.

१४. नागेशलीलामृत, अ. ३२ ओ. ३०–७८



अनुक्रमणिका






मी तसाच सोडला होता. तो पुन्हा हाती घेतो. चांगदेव राऊळ व नागनाथ यांचेही निकटचे नाते आहे. चांगदेव राउळांचे गुरु नागनाथ हे हरिनाथांचे शिष्य असावेत असे मत श्री. रा. चिं. ढेरे यांनी व्यक्त केलेले आहे. हे नागनाथ म्हणजेच 'राऊळ' शाखेचे प्रवर्तक असावेत असाही त्यांचा तर्क आहे.[१५]

श्री. ढेरे यांच्या तर्काहून वेगळे अनुमान मला मांडावयाचे आहे. ते म्हणजे वडवाळसिद्ध नागेश किंवा वटसिद्ध नागनाथ हे 'राऊळ' शाखेचे प्रवर्तक असावेत. नवनाथात वटसिद्ध नागनाथांची गणना होते.[१६] आणि नागनाथांच्या सहा शिष्यात 'चांगुलसिद्ध' असेही एक नाव नरहरि मालू देतो.[१७] येथील 'चांगुल' म्हणजे चांगदेव असेल काय : हा चांगदेव– चांगावटेश्वर की चांगदेव राऊळ ? वटसिद्ध नागनाथांना 'वटेश्वर' किंवा 'राऊळ' असे नाव दिलेले आढळते काय ? माझ्या तर्काला उपोद्बलक पुरावा नाही म्हणून मौन न स्वीकारता हे कबूल करतो की निदान माझ्या माहितीप्रमाण मला उपलब्ध असलेल्या साधनांमध्ये अजून मला तसा संदर्भ सापडलेला नाही.

'नागेशसहस्रनामा'त, 'अष्टोत्तरशतनामा'त आणि 'द्वादशनामा'त मला चांगदेव, वटेश्वर किंवा राऊळ यांच्याशी नागनाथांचा संबंध जोडता येईल असे नाव मिळाले नाही. 'केशवचैतन्यादि बोधकाय नमः', 'बहिरंभट्टोत्धाराय नमः' 'हेगरसवरदाय नमः', अशा नावांमध्ये नागनाथांनी ज्यांच्यावर अनुग्रह केला त्यांचा निर्देश आहे. नागनाथांशी चांगदेवांचा काही संबंध असता तर कोठेतरी हा उल्लेख आला असता की नाही ? तसेच विस्ताराने नागनाथांच्या व त्यांच्या भक्तांच्या कथा देणारे 'नागेशलीलामृत' याबाबत काहीच कसे सांगत नाही ?

नागनाथांना 'अवधूतरूपाय नमः' असे नमन केले आहे– नामावळीत चांगदेव हाही स्वतःला 'अवधुत' म्हणवून घेतो.[१८] 'तत्वसार' ग्रंथातील तत्वज्ञानाचा व काही आचारविषयक निर्देशांचा[१९] विचार हा स्वतंत्र विषय आहे. पण त्या अभ्यासातूनही नागनाथ- चांगदेव संबंध मानण्यास काही आधार सापडतील.

आता चांगदेव राऊळ यांच्याविषयी. नागनाथ व राऊळ यांचे नाते जोडता येते काय हे पाहण्यापूर्वी नाथपंथातील 'राऊळ' शाखेची माहिती देणे योग्य ठरेल. प्रा. जी. डब्ल्यू. ब्रिग्ज यानी 'Rāwal or Nāgnāth' या परिच्छेदात म्हटले आहे. This is the third of the original Shiva group. The Rāwals, who are the most important of the Musalman Yogis, are great wanderers. In the western districts of the Punjab 'they are occultists and quacks.' There are two main groups of them : (1) The Madia, said to have been founded by Gorakhnath; and (2) The Gal who are referred to Shiva and who are known both as Pagalpanthis and as Rāwal Galla."[२०] 'राऊळ' शाखा ही कानफाट्यांपैकी मानली तर नागनाथांना व चांगदेव-राउळांनाही कानफाट्या मानावे लागेल. ब्रिग्जचे वरील अवतरण नागनाथ व राऊळ या दोन शब्दांना जोडण्याचे काम करीत आहे. 'राऊळ' या नाथ-शाखेचा

१५. श्री गोरक्षनाथ : चरित्र आणि परंपरा, पृ. १९३

१६. नवनाथ भक्तिसार, अ. ३६ ओ. ३७,

१७. चांगुलसिद्ध धर्मसिद्ध । देवसिद्ध भोमसिद्ध ।
देवनसिद्ध भोमनसिद्ध । कोकिळ सुंदर चक्षू तो ॥ ३७ : १७९ ॥

१८. तत्वसार, ओवी १०२५.

१९. उदाहरणार्थ, 'गुरूनि मूखिचा उगाळु दीधला' अशा प्रकारचा उल्लेख. ही प्रसादपद्धति महानुभावीय वातावरणात असली तरी तत्पूर्वी तिचा 'सिद्धपंथु' अभ्यासिला पाहिजे. त्यासाठीही नागनाथांकडे आले पाहिजे.

२०. Gorakhanath and the Kanphata Yogis, P. 66












मुसलमानांशी येणारा जवळचा संबंध ध्यानात घेता नागनाथ व चांगदेव राऊळ अधिक निकट येतात. 'राऊळ' शाखेत मुसलमानांचा भरणा आहे. धर्मनाथ हा 'रावळपीर' झाला व मांडवीच्या पूर्वेस किनाऱ्यावर त्याचे देऊळ आहे.[२१] मराठा राऊळ–जोग्यांत 'मुराद' नांवाचा वर्ग आहे. 'मुराद' हा पर्शियन शब्द आहे. 'मुरिद' असाही एक शब्द आहे. त्यातील फरक असा :– "Murid is one who has attraction towards God; and Mnrad is one whom God attracts towards Himself."[२२] मुराद हा शब्द देखील 'राऊळ' शाखेचा मुसलमानांशी असणारा संबंध सांगतो. नागनाथांचा व त्यांच्या संप्रदायाचा मुसलमानांशी आलेला संबंध पाहता (त्यांना व त्यांच्या काही शिष्यांना मिळालेली मुस्लिम नावे पाहता) 'राऊळ' शाखेशी वडवाळसिद्ध नागनाथांचा जवळचा संबंध दिसतो एवढे नक्की. मग ते या शाखेचे प्रवर्तक असावेत, हा माझा तर्क खरा ठरो अथवा खोटा ठरो.

नागनाथ व चांगदेवराऊळ यांचा गुरुशिष्यसंबंध (?) सिद्ध करता आला नाही तरी दोघांनाही दत्तांचा अनुग्रह होता. नागनाथ दत्तदर्शनासाठा कसे वेडे झाले होते याचे वर्णन नरहरी मालू करतो.[२३] चांगदेव राऊळांना दत्तांनी **व्याघ्ररूपाने** दर्शन दिले होते हे सर्वश्रुत आहे. 'व्याघ्र' चा आपल्याकडे काहीसा प्रतीकात्मक वापर होत असलेला दिसतो. व्याघ्राचा दत्त, शिव, शक्ति, बुध, यांच्याशी असणारा संबंध (व्याघ्रेश्वर किंवा व्याघ्रेश्वरी अशा नावातूनही सुचविला जाणारा) अभ्यसनीय आहे. चांगदेवांच्या व्याघ्रारोहणाचा वेगळा काही अर्थ लागणे शक्य आहे. चांगदेव राऊळांचा दत्तदर्शनाच्या निमित्ताने वाघाशी संबंध येतो व चांगदेव वटेश्वर हे तर 'बाघसवार'– व्याघ्रारूढ होते. या दोघांचा नामसादृश्याहून अधिक काही संबंध असेल काय ?

वटेश्वर चांगदेव हे श. १२४७ मध्ये समाधिस्थ झाले असे मानले जाते. चांगदेवराऊळ हे त्यांच्या पूर्वी सुमारे शंभर वर्षे आधी होऊन गेले. चांगदेव-वटेश्वरांसंबंधी असा एक समज प्रचलित आहे की, ते योगबलाने दर शंभरवर्षांनी नवा देह धारण करीत व अशाप्रकारे ते चौदाशे वर्षे जगले होते.[२४] चांगदेव राऊळ हा वटेश्वर चांगदेवांचा पूर्वावतार (१३ वा ?) असेल काय ? निदान तशी लोक–कल्पना असेल काय ? राजा बाघसवारांच्या स्थानांचा व कथांचा अभ्यास करीत असताना ही स्थाने व या कथा चांगदेवविषयक उपर्युक्त लोक–कल्पनेवर ( भ्रमावर म्हणावे हवे तर !) आधारल्या असाव्यात असे वाटू लागते. चांगदेवांच्या एका अवताराचे वर्णन महीपतीने केलेच आहे. त्याचे इतरही अनेक अवतार इतरांनी मानले असावेत व त्यांतूनच राजा बाघसवारांची स्थाने व कथा निर्माण झालेल्या दिसतात. हजरत अब्दुल रजाक कादरी व सय्यद ताजुद्दीन या नावाचे मुस्लिम सत्पुरुष होऊन गेले असतील, पण त्यांची व चांगदेवांची सांगड घातली गेली. महानुभावांप्रमाणेच नाथांचीही काही स्थाने 'कबरी' प्रमाणे दिसत होती : काळाला अनुसरून तशी बनविली गेली होती. राजा बाघसवारांच्या स्थान पैकी काही कबर-वजा स्थाने अशीच असावीत. काही ठिकाणी प्रत्यक्ष एखाद्या मुस्लिम सत्पुरुषाचे दफन झाले असावे. राजा बाघसवार हे एक कोडे आहे. मला कळले आहे ते एवढेच की या नावाने नाथ-महानुभाव-इस्लाम यांच्यात एक अनुबंध निर्माण केला आहे. हिंदु-मुस्लिम ऐक्याला आलेले ते एक फूल आहे.

---

२१. Ibid, P. 117–118.
Ibid, 55

२२. Studies in Tasawwuf, P. 153, (Foot-note).

२३. नवनाथभक्तिसार, अध्याय ३६ व ३७.

२४. 'भक्तलीलामृता'च्या अ. ३ ओव्या ५३-५९ मध्ये महीपतीने असे म्हटले आहे की, चांगदेव शंभर वर्षे झाली की स्थळ बदलीत : त्या स्थळी यात्रा भरे. अशी चांगदेवांची चौदा स्थळे बनली. या चौदा स्थळी त्यांना भिन्न भिन्न नावानी ओळखले जाणे शक्य आहे. त्यांनी समाधि घेतल्यानंतरही त्यांच्याविषयींच्या महीपति–निर्दिष्ट समजामुळे काही नवीन चांगदेव-स्थळे निर्माण झाली असावीत.

– मध्ययुगीन चरित्रकोश, पृ. ३७५.



अनुक्रमणिका

डॉ. ग. मो. पाटील

# प्राचीन भारतातील समाजकल्याण योजना

## भगिरथाचा वारसा

योजना शब्द ऐकल्याबरोबर पहिली पंचवार्षिक योजना, दुसरी पंचवार्षिक योजना इत्यादि आधुनिक स्वतंत्र भारतातील शब्दप्रयोग आणि तदनुषंगिक भारताच्या पुनरुद्धारासाठी– स्वराज्याचे सुराज्य करण्यासाठी– चाललेल्या महान आणि प्रचंड कार्याचा एक चित्रपट आपल्या डोळ्यासमोर उभा राहतो. आपण आज फार भाग्यवान म्हणून स्वतंत्र भारताने अशाप्रकारे समाजाच्या उद्धाराच्या, उत्कर्षाच्या आणि उन्नतीच्या नवनवीन योजना आखलेल्या आणि त्या पार पाडलेल्या आपणास पहावयास मिळतात. पण भारताच्या पुनरुत्थापनाच्या दृष्टीने होणाऱ्या या समाजकल्याण योजनांनी केवळ आश्चर्यचकित होऊन –दिङ्मूढ होण्याइतपत या कल्पनांचे नाविन्य भारताला नाही याची जाणीव फक्त आपला प्राचीन इतिहास आणि समृद्ध प्राचीन संस्कृत वाङ्मयच आपणास देऊ शकेल. पण आज त्या गीर्वाणभारतीचीच उपेक्षा होऊ लागली आहे हे आपले दुर्दैव ! त्यामुळे ' तुझे आहे तुजपाशी ' हे मुद्दाम आज संशोधनपूर्वक लोकाना सांगावे लागते याची खंत वाटते. अस्तु.

समाजकल्याणाच्या दृष्टीने निसर्गनिर्मित परिस्थितीचा उपयोग करून घेऊन मानवाला उपकृत करणाऱ्या महान विभूतीमध्ये प्रथम क्रमांक भारतात कुणाचा लागत असेल तर तो प्रागैतिहासिक काळातील इक्ष्वाकुवंशीय राजा भगीरथ याचा ! हिमालयात उगम पावून आपले पाणी इतस्ततः नुसतेच विखुरणाऱ्या गंगा नदीचा ओघ वळवून आणि विन्ध्य–हिमालयाच्या खोऱ्यातील विपुल भूभागासाठी जलाची समृद्धी करून त्याने त्या आर्यावर्ताला स्वर्गाचे वैभव प्राप्त करून दिले. गंगावतरणाच्या रूपकाच्या स्वरूपात ही कथा आपणास रामायणादि ग्रंथातून वाचावयास मिळते. पुराणकालीन सर्व रूपककथांचे तत्त्व समजावून घेऊन त्यांचा योग्य अर्थ लावण्याचा प्रयत्न केल्यास आपणास केवळ भारताचा राजकीयच नव्हे तर भारतातील नानाविध प्रगतींचा आणि सुधारणांचा इतिहास प्राप्त होऊ शकतो. इतस्ततः विखुरणाऱ्या गंगेच्या पाण्याला एका प्रवाहात सोडून तो प्रवाह योग्य मार्गाने मानवसमाजाच्या उन्नतीसाठी समृद्ध भूभागातून नेऊन त्याला सुजल, सुफल आणि सस्यश्यामल करण्याचे महान दुर्घट कार्य भगिरथाने केले. त्याच्या प्रयत्नाचे स्वरूप इतके प्रचंड आणि उत्तुंग आहे की अशा प्रयत्नांना ' भगीरथ प्रयत्न ' म्हणण्याचा वाक्प्रचारच आर्यभारतीय भाषांत रूढ झाला आहे. केन्द्र सरकारच्या एका प्रचारपत्राचे नावपण ' भगीरथ ' आहे यावरून याचे महत्व आपल्या लक्षात येईल.

## ऋग्वेदातील जलयोजना

निसर्गाने उपलब्ध करून दिलेल्या साधनांखेरीज मानवाने स्वबुद्धिकौशल्याने आणि स्वकर्तृत्वाने निर्माण केलेल्या कृत्रिम साधनांचा संदर्भ ऋग्वेदासारख्या मानवसमाजाच्या प्राचीनतम ग्रंथातपण आपणास आढळतो : लागवडीलायक जमिनीचे दोन प्रकार आढळतात; देवमातृका आणि अदेवमातृका. देवमातृका म्हणजे देव अर्थात वरुण देव पर्जन्यवृष्टी करून जिला मातेप्रमाणे पोसतो अशी पावसाच्या पाण्याने पीक देणारी खरीप जमीन, दुसरी वरुणदेवाच्या – पर्जन्याच्या साहाय्यावरच केवळ नव्हे तर इतर पद्धतीने पिकविली जाणारी अशी रब्बी पिकाची अदेवमातृका जमीन ! अशा अदेवमातृका जमिनीच्या शिंपण्याचा आणि पाणीपुरवठ्याचा प्रश्न विहिरींच्या अगर काल्व्याच्या पाण्याने सोडविला जाई. ऋग्वेदात अशा दोन्ही प्रकारच्या जलसिंचाईचा उल्लेख आहे. तिसऱ्या मंडलाच्या पंचेचाळीसाव्या सूक्तातील तिसऱ्या ऋचेत विश्वामित्र ऋषी इंद्रदेवतेला उद्देशून म्हणतात :

गम्भीरा उदधीरिव क्रतुं पुष्यसि गा इव ।
प्र सुगोपा यवसं धेनवो यथा ह्रदं कुल्या इवाशत ॥

– ऋ. ३. ४५. ३









अनुक्रमणिका

" हे इन्द्रा, ज्याप्रमाणे कुशल गोपाल धेनूंचे पालन करतो त्याचप्रमाणे तू महान सागराच्या पाण्याप्रमाणे यजमानाच्या इच्छा पुरवितोस. तृषार्त गाई ज्याप्रमाणे तृणाकडे जातात त्याप्रमाणे सोम महाजलाशय व कृत्रिम कालवे यांना व्यापून टाकतो.

या ठिकाणी ह्रद आणि कुल्या अशा दोन्ही शब्दांचा उल्लेख आला आहे त्यावरून निसर्गनिर्मित (अगर क्वचित मानवनिर्मितपण) तलाव आणि पाणी-पुरवठा करणारे कालवे अगर पाट यांचाच आपणास बोध होतो. दुसरा संदर्भ तर याहूनही स्पष्ट आहे. वसिष्ठ ऋषी आपदेवतेला उद्देशून म्हणतात :–

या आपो दिव्या उत वा स्रवन्ति खनित्रिमा उत वा याः स्वयंजाः ।
समुद्रार्थाः याः शुचयः पावकास्ता आपो देवीरिह मामवन्तु ॥ ७–४९–२.

" स्वर्गातून पडलेले दिव्य म्हणजे पावसाचे पाणी, स्वतःच निर्माण होऊन वाहणारे नदीझऱ्यांचे पाणी आणि खणल्यामुळे वाहणारे पाणी हे सर्व सागराकडेच धाव घेत असतात. निर्मल आणि शुद्ध करणाऱ्या या जलदेवता माझे रक्षण करोत. "

या ऋचेत दाखविलेला पाण्यापाण्यातील भेद अगदी स्पष्ट आहे. पावसाचे पाणी स्वर्गातून पडते म्हणून ते दिव्य तर नदीनाल्यांचे पाणी स्वतःच उत्पन्न होऊन वाहते म्हणून ते स्वयंभू आणि खणण्यामुळे येणारे पाणी, मग ते विहिरी खणण्यामुळे शेतीला उपयोगी पडेल अथवा कालवे खणण्यामुळे नदीतून घेऊन शेतीच्या कारणी लागेल. हा तिसरा प्रकार म्हणजे मानवाने आपल्या उणिवा आणि गरजा लक्षात घेऊन आपल्या कल्याणासाठी केलेल्या प्रयत्नांचेच प्रतीक आहे. आजच्या समाजकल्याण योजनांत विहिरी खणणे आणि पाटाने कालव्याने जमिनी शिंपणे व अधिक धान्योत्पादन करणे यांचा समावेश होतोच की !

## सुदर्शन प्रकल्प

यानंतरच्या संस्कृत साहित्यात एका प्रचंड समाज-कल्याण योजनेचा सुमारे सात आठ शतकांचा प्रदीर्घ इतिहास आपणास आढळतो. सौराष्ट्रात जुन्या ऊर्जयत् म्हणजे आजच्या गिरनार पर्वताच्या खोऱ्यात सुदर्शन नावाचे एक विस्तीर्ण सरोवर होते. कदाचित् ते निसर्ग-निर्मित असून निरनिराळ्या प्रकारची कमळे, राजहंस, क्रौंच आदि पक्ष्यांच्या उपस्थितीमुळे आणि विशालते-मुळे खरोखरच सुदर्शन नामाभिधान सार्थ करीत असावे. पण तीन बाजूने पर्वतराजी असलेल्या या सरो-वराचे धरणाच्या साहाय्याने प्रचंड जलाशयात रूपांतर करण्याची एक अपूर्व कल्पना चंद्रगुप्त मौर्याचा सौराष्ट्रा-तील प्रतिनिधी पुष्यगुप्त याच्या मनात आली. त्या नैसर्गिक परिस्थितीचा फायदा घेऊन आणि रैवतक व ऊर्जयत् पर्वतात उगम पावून सरळ सागराच्या भेटीस धाव घेणाऱ्या पलासिनी आणि सुवर्णसिकता या नद्यांचे पाणी त्या सुदर्शन तलावात सोडून त्याने या प्रकल्पाचा एक भाग सिद्ध केला, आणि चौथ्या बाजूने एक प्रचंड धरण बांधून ते पाणी त्या सुदर्शन तलावाच्या विस्तीर्ण जलाशयात साठवून ठेवून त्याने आपली कामना पूर्ण केली. ही गोष्ट इ. स. पूर्वी ३१० या साली घडली.

पण त्या धरणाचा शेतीला पाणीपुरवठा करण्याच्या दृष्टीने प्रत्यक्ष उपयोग झाला तो सम्राट अशोकाच्या शासनकाळात ! सौराष्ट्राचा तुषास्प या नावाचा एक इराणी प्रांताधिप होता. यवन असा त्याचा उल्लेख त्या वेळच्या साहित्यात आढळतो. त्याने इ. स. पूर्वी २६० मध्ये या धरणातून कालवे काढून शेकडो मैल दूर पसरलेल्या हजारो एकर जमिनीत पाणीपुरवठा करून त्या जमि-नीला सुजला करून सोडले आणि सौराष्ट्राचा पूर्वीचा रानवट आणि भुकेकंगाल भूप्रदेश धनधान्यसमृद्ध आणि सुफल केला. पण त्यावेळी सौराष्ट्रात होणाऱ्या जोरदार पर्जन्यवृष्टीमुळे गिरनार खोऱ्यातील नद्यांना प्रचंड पूर येत आणि कित्येकदा प्रदेश जलमय होऊन जाई. इ. स. १५० मध्ये अतिपर्जन्यामुळे वरील सुदर्शन जलाशयाचे धरण फुटले आणि त्या प्रदेशावर अभूतपूर्व संकट कोसळले. तेव्हा महाक्षत्रप रुद्रदामन् राज्य करीत होता त्याचा अमात्य सुविशाख याने कोट्यावधी रुपये खर्च करून या धरणाची डागडुजी करण्याचे व त्याला पूर्वीचे स्वरूप देण्याचे ठरविले. शावाक्ष या इराणी नावाशी सादृश्य असल्यामुळे हापण इराणीच असावा की काय अशी शंका येते. पण बाकीच्या सल्लागारांचा विरोध असताही त्याने या कामात लक्ष घालून ते काम पूर्ण केले. त्या काळी म्हणजे १८०० वर्षांपूर्वीसुद्धा भारता-तील वास्तुशिल्प किती प्रगत होते याचा पुरावा म्हणजे या सुदर्शन तलावाचे पुनर्व्यवस्थापन ! पुराच्या पाण्यामुळे धरणाला धोका पोहोचू नये आणि गाळ साचून पाणी तुंबू नये म्हणून प्रसंगी उपयोगी पडणारी,








निचरा करणारी दारेसुद्धा या धरणाला बांधली होती. सुविशाखाने धरणाची दुरुस्ती करताना भिंत पूर्वीच्या दुप्पट केली आणि त्यांच्या त्या वेळच्या कल्पनेप्रमाणे एक चिरंतन टिकणारे आणि अभिमानास्पद असे धरण रुद्रदामन्‌च्या काळात निर्माण झाले. गिरनार येथील रुद्रदामन्‌च्या प्रशस्तीपूर्ण शिलालेखात या गोष्टीचा गौरवपूर्ण उल्लेख करण्यात आला आहे.

पण निसर्गावर मात करू पाहणाऱ्या मानवाला निसर्ग नेहमीच मोठा तडाखा देतो आणि त्याची मानहानी करतो; इतकेच नव्हे, तर त्याला दौर्बल्याची दुःखद जाणीव करून देतो. तसेच सुदर्शन तलावाबाबत घडले. स्कंदगुप्ताच्या शासनकाळात गुप्त शकाच्या १३६ व्या वर्षी भाद्रपद शुद्ध षष्ठीला म्हणजे इ. स. ४५५ मध्ये पावसाळ्यात सतत वृष्टीने हे धरण पुन्हा फुटले. तरी त्यावेळची वास्तुशास्त्राची अवस्था, आजच्या मानाने प्रगत आणि कुशल तंत्रज्ञांची उणीव आणि स्थापत्यशास्त्राची अपूर्णता लक्षात घेता त्या धरणाने ३०० वर्षे काढली म्हणजे फारच मोठा कालावधी गेला असे म्हणावे लागेल. आजच्या कित्येक धरणांच्या बांधणीशी तुलना करता ती धरणे अधिक मजबूत होती की काय असेच म्हणावेसे वाटते. सुदर्शन तलावाची दुर्दशा उडून ते दुर्दर्शन म्हणजे भीषण भयानक झाले. सर्वत्र पाणीच पाणी झाले. गिरनारच्या खोऱ्यात एकच हाहाकार उडाला. लोक रात्र-रात्र आळीपाळीने जागत बसले आणि त्यानी घरादारांचे, पशुगुरांचे आणि स्वतःच्या व समाजातील इतरांच्या वित्ताचे रक्षण केले. तरीपण मनुष्यहानी अगर वित्तहानी किती झाली याची न्यायालयीन चौकशी कोणी केली नाही अगर कोणी तशी मागणीपण केली नाही. यावेळीपण निसर्गाच्या प्रबलतम प्रकोपाला न भिता त्याला पुन्हा आव्हान देण्याची तयारी स्कंदगुप्त आणि त्याचा सौराष्ट्राचा प्रांताधिप पर्णदत्त यानी केली. पर्णदत्ताचा मुलगा चक्रपालित हा गिरिनगरचा म्हणजे जुनागडचा नगररक्षक होता. त्याने धार्मिक विधि करून या कामाला सुरुवात केली आणि अमाप खर्च करून दोन महिन्यामध्ये १०० हात लांब, ६८ हात रुंद आणि सात पुरुष उंच असा धरणाच्या भिंतीचा कोसळलेला भाग बांधून पुरा केला. चैत्र महिन्याच्या शुद्ध प्रतिपदेला देवताप्रीत्यर्थ यजन करून ब्राह्मणांना आणि सेवकांना - पौरांना यथाविधी यथार्ह दक्षिणा - भेटी - नजराणे देऊन त्याने या कामाची पूर्तता केली. सुदर्शन पुन्हा ‘ सुदर्शन ’ झाले आणि प्राचीन भारतातील समाजकल्याण योजनेतील आणखी एक प्रकल्प सिद्ध झाला.

### विश्वस्तनिधी

संशोधकांनी अपार परिश्रम घेऊन उपलब्ध केलेल्या अनेक प्रस्तरलेखातून, ताम्रपत्रातून, शिला लेखातून आणि तालपत्रातून अनेकानेक समाजकल्याण योजनांचे उल्लेख संस्कृत भाषेच्या अभ्यासकाला प्रत्यही आढळतात. कुठे एखाद्या प्रांताधिपाने एखादी परिमित जमीन एखाद्या संस्थेला अगर मठाला दान दिलेली असते तर कुठे एखाद्या राजपुत्राने, मांडलिकाने, धनिकाने अगर सम्राटाने एखादी विहीर, तलाव अगर उपवन तयार करून ते लोकोपयोगासाठी मोकळे ठेवलेले असते. या मागच्या प्रेरक शक्ती पुष्कळदा ऐहिक कीर्ती आणि पारलौकिक कल्याण या असल्या तरी त्यामुळे समाजाचे पाऊल निश्चित रीतीने पुढेच पडत असे. रोग्याच्या शुश्रूषेकरिता, एखाद्या संस्थेच्या निर्वाहाकरिता अथवा विशिष्ट समाजाच्या चरितार्थाकरिता निर्माण केलेले हे लहान लहान विश्वस्तनिधी म्हणजे लहान प्रमाणात समाजकल्याण योजनाच होत्या. जुने शिलालेख, ताम्रपट यावरची अनेक पुस्तके पाहिली अथवा अशोककालीन कलचुरीकालीन अथवा अन्य शिलालेख पाहिले की याची साक्ष पटते. जयसिंहाच्या इ. स. ९२६ च्या जबलपूरच्या शिलालेखात म्हटले आहे की, राजाने निर्माण केलेल्या बागा, तलाव व ब्राह्मणांची प्रासादतुल्य घरे यामुळे ही पृथ्वी जणू स्वर्गाला मागे टाकत होती.” (उद्यानसरसीसत्रप्रासादद्विजवेश्मभिः। भूमिः परिभवत्यस्य न कैर्भूषाभैर्दिवम् ॥) दुसऱ्या पृथ्वीदेवाचा इ. स. ९१० चा रतनपूर शिलालेख प्रसिद्ध आहे. त्यात म्हटले आहे, ‘ खाडाग्रामसमीपपर्वतं बंधयित्वा सरोवरं निर्मितं आम्रशतमारामोद्यानं पूर्वोत्तरं सडविडग्रामपर्वततले परमसदयेन सर्वजनमनोहराम्रशतत्रयोपेता तडागिका कृता तथा...विपुलजलपूर्णं सरोवरं सप्राकारानेकप्रासादा ... देवपर्वततले सुगम्भीरा वापिका कारिता। [ खाडा गावच्या जवळच्या पर्वताला बांध घालून एक सरोवर निर्माण केले व एक पूर्वोत्तर तीनशे आम्रवृक्षांचे आरामोद्यान बांधले. सडवीड गावाजवळ पर्वताच्या पायथ्याशी त्या












परमदयाळू राजाने एक सरोवर आणि तीनशे वृक्षांची आंबराई निर्माण केली व देवपर्वताच्या तळाशी एक अतिशय खोल विहीर बांधली. ]

## चाणक्यप्रणीत समाजकल्याण योजना

कौटल्याच्या अर्थशास्त्राकडे वळल्यास आपणास अज्ञात आणि अभूतपूर्व असा सामाजिक कल्याणाचा मार्ग आढळतो. त्यावेळच्या राज्यशास्त्राप्रमाणे संमत असलेल्या सर्व विभागावर अध्यक्ष नेमून त्याकरवी शासनयंत्रणा कार्यक्षम आणि समाजोन्नतिप्रवण करण्याचा त्याचा प्रयत्न आदर्श आणि आदरणीय आहे. लोकव्यवहारात लाचलुचपत, काळाबाजार, भ्रष्टाचार अगर विधिभंग आजच होत आहे असे मानण्याचे सुतराम कारण नाही. त्यावेळीसुद्धा असे समाजद्रोही लोक होतेच, पण सुयोग्य आणि पूर्वपरीक्षित अधिकाऱ्याकरवी त्यांचे आणि त्याना शासन होत असल्यामुळेच परकीय प्रवाशांनीपण स्तिमित होऊन प्रशंसा करावी अशी आदर्श समाजव्यवस्था आणि सुनियंत्रित शासनयंत्रणा त्याकाळी रूढ झाली होती. पूर्वीच्या काळी दारांना कुलुपे लावीत नसत असे म्हणतात. ( कुलूप हा शब्दच कुफल् या अरबी शब्दाचा अपभ्रंश आहे. त्यापूर्वी अशा कल्पनेचा शब्दच भाषेत रूढ नव्हता ! ) पण चोरी करणारेच नव्हते तर अशा दक्षता घेण्याचे तरी कारण काय ? शिक्षेच्या अनेक प्रकारापैकी प्रतिबंधक शिक्षा हा एक महत्त्वाचा भाग आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात अनेक ठिकाणी अशा शिक्षांचे आदेश दिले आहेत की ज्यामुळे गुन्ह्याकडे प्रवृत्तीच होत नसे. जर कोणी लोभाने अगर मोहाने गुन्हा केलाच तर त्याला अशी शिक्षा होई की ज्यामुळे इतरांना जरब बसून गुन्हेगारप्रवृत्तीला आळाच बसत असे.

खाणकामगार, कापडधंद्यातील मजूर, शेतकरी या सर्वांच्या कल्याणाच्या दृष्टीने अर्थशास्त्रात सांगोपांग विचार केला असून समाजोपयोगी निरनिराळ्या धंद्यातील आणि व्यवसायातील यंत्रणा व्यवस्थित चालावी म्हणून मार्गदर्शन केले आहे. राज्यशास्त्राचा अभ्यास त्यावेळीपण विद्वान विचारवंतामध्ये फार अहमहमिकेने होत असे असे अर्थशास्त्राच्या प्रस्तावनेवरूनच दिसते. " पृथिव्या लाभे पालने च यावन्त्यर्थशास्त्राणि पूर्वाचार्यैः प्रस्थापितानि प्रायशस्तानि संगृह्य एकमिदमर्थशास्त्रं कृतम् । " अर्थात सर्व पूर्वाचार्यांच्या विचाराचा आणि मतप्रणालिकांचा परिपाक या ग्रंथात उतरला आहे हे खासच ! यातील दुसरे प्रकरण अध्यक्षप्रचार या नावाचे आहे. यातील यादी वाचली तरी समाजाच्या कल्याणासाठी त्यावेळी कोणकोणत्या विभागांची आवश्यकता होती याची कल्पना येते. सुपरीक्षित आणि सुयोग्य अशा २५ अध्यक्षांचा कौटल्याने उल्लेख केला आहे. अध्यक्ष हे जरी वरिष्ठ अधिकारी असले तरी कर्तव्यच्युतीबद्दल, दुर्लक्षाबद्दल आणि भ्रष्टाचाराबद्दल त्यानाही शासन करण्यात येत असे. त्यामुळे त्यांच्यावर शासनाची टांगती तलवार असे. मग हे अधिकारी समाजकल्याणाखेरीज इतर गोष्टी करतील तरी कशा आणि दफ्तरदिरंगाईची लालफीत तरी येथे आढळणार कशी ? उदाहरणार्थ, सूत्राध्यक्ष हा जणू आजचा कापड विभागाध्यक्ष ! लोकर, झाडाची साल, कापूस, उंची कापूस अगर रेशमी वस्त्रे विणण्याबद्दल मेहेनताना ठरलेला असे. कारागिरांना त्यांचे वेतन योग्य तऱ्हेने मिळते की नाही हे पाहणे त्याचे मुख्य काम ! कौशल्याप्रमाणे अधिकपण वेतन मिळे आणि कुशल कारागिराला प्रोत्साहन मिळाल्यामुळे नवनवीन उच्च दर्जाची वस्त्रेपण निर्माण होत. साहजिकच समाजातील वैयक्तिक घटकांचा दर्जा उंचावेल त्या प्रमाणात समाजपण उंचावत जात असे. स्त्रियांनी सूतकताईच करावी असा दण्डक होता. घराबाहेर पडू न शकणाऱ्या स्त्रिया दासीमार्फत सूतवेतनांची नेआण करीत असत तर वस्त्रागारावर स्वतः येणाऱ्या स्त्रिया भल्या पहाटे येत असत. सूत देऊन न बोलता त्या वेतन घेऊन जात. त्यांच्या तोंडाकडे पाहण्याची अगर त्यांच्याशी बोलण्याची बंदी असे. दिवा ध्यायचा तो फक्त सूत तपासण्यापुरताच ! स्त्रियांशी बोलणाऱ्यास अगर त्यांना वेतन देण्यात विलंब लावणाऱ्यास अगर त्यांना आगाऊ पैसे देणाऱ्यास शिक्षा होत असे. यामुळे कामगारस्त्रियांचे शील सुरक्षित होते.

शेतीच्या उत्पादनाबद्दल फारच योजनापूर्वक व्यवस्था आखण्यात आली होती. जलसिंचाईबद्दल अनेक कल्पना रूढ होत्या. विहिरीने पाणी देणे अगर नदी, तलाव, सरोवर यातून पाणीपुरवठा करणे इत्यादी अनेक प्रकार आढळतात. चांगल्या बियाणाचा भरपूर पुरवठा करणे हे सीताध्यक्षाचे काम ! बियाला कीड, मुंगी, वगैरेमुळे उपद्रव पोहोचू नये म्हणून मुद्दाम दक्षता घेण्यात येत असे. काही बियाणाला मध, तूप,



अनुक्रमणिका








डुकराची चरबी, विष्ठा, अगर गाईंच्या हाडाची पूड वगैरेंचा आवश्यकतेप्रमाणे लेप करण्यात येई.

नगराध्यक्ष नागरिक म्हणून ओळखला जाई. आणि त्याची कर्तव्ये समाहर्ता अगर जिल्हाध्यक्ष यांच्याच सारखी असत. शहरात वेळी अवेळी येणाऱ्याजाणाऱ्या-वर कार्यालयात वर्दी देण्याची सक्ती असल्यामुळे ठरलेल्या वेळेनंतर कारणाशिवाय कोणीही शहरात भटकताना आढळत नसे. अग्निशमन व्यवस्था ठेवणे नागरिकाला आणि नगरातील लोकांना अनिवार्य होते. मातीचे पाण्याने भरलेले घडे, लाकडी भांडी, शिडी, कुऱ्हाड, सूप, अंकुश, पातेरी, पखाल वगैरे उपकरणे जर कोणी सिद्ध ठेवली नसली तर तो शिक्षापात्र ठरत असे. आग लागली असता जर एखादा शेजारी धावून गेला नाही तर त्याला दंड होत असे. नागरी रस्त्यावर घाण करण्यामध्ये लहान बालकांचा आणि त्याना योग्य वळण न लावणाऱ्या पालकांचा फार मोठा भाग पुष्कळदा असतो. गुजराथमध्ये मोठाल्या शहरी हम-रस्त्यावर ही घाणेरडी प्रथा आजही चालू असल्याचे आढळते. पण रस्त्यावर अशी घाण करणाऱ्यांना त्याच-प्रमाणे रस्त्यावर उकिरडा, सडलेला भाजीपाला, उच्छिष्ट वगैरे टाकणाऱ्यांना कौटल्याने सक्त दण्ड ठोठावण्याबद्दल आदेश दिले आहेत. नागरीप्रदेश स्वच्छ आणि निर्मळ असणे हा पण समाजकल्याणाचाच एक आवश्यक भाग आहे.

कौटिलीय अर्थशास्त्रातील चौथे अधिकरण "कण्टक-शोधन" असे आहे. समाजाला नाना प्रकारे फसव-णाऱ्या, आपल्या स्वार्थासाठी समाजजीवन गढूळ करणाऱ्या समाजकंटकाना शोधून काढून त्यांची परीक्षा करून त्यांना योग्य तो दंड करणे हा या अधिकरणाचा उद्देश आहे. वैदेहकरक्षण या विषयाबद्दल लिहिताना, "सारभाण्डमित्यसारभाण्डं तज्जातमित्यतज्जातं राधा-युक्तं उपधियुक्तं समुद्गपरिवर्तितं वा विक्रयाधानं नयतो हीनमूल्यं चतुष्पञ्चाशत्पणो दण्डः पणमूल्यं द्विगुणः द्विपणमूल्यं द्विशतः। तेनार्घवृद्धौ दण्डवृद्धिर्व्याख्याता।" अशा प्रकारे दंडयोजना करून लबाडी करणाऱ्या व्यापाऱ्यांना दण्डविधान केले आहे. मालात भेसळ करणारे, खोटी मोजमाप वजने वापरणारे व्यापारी, कारागीर व मजूर यांचे योग्य वेतन न देणारे कारखान-दार वगैरे समाजद्रोही कारवाया करणाऱ्या समाज-कंटकाना प्रतिबंधक दण्डयोजना केली आहे. ("कमी किमतीचा माल जास्त किमतीचा असे भासवून, ज्या प्रांतात तो तयार झाला नाही अगर ज्या वस्तूपासून तो तयार केला नाही त्याच प्रांतात अगर त्याच वस्तू-पासून तो तयार झाला असे सांगून, खोटी चकाकी लावून, भेसळ करून, नकली माल वरील वेष्टन बदलून विकणाऱ्या किंवा गहाण टाकणाऱ्या व्यापाऱ्याला ५४ पण दंड, या वस्तूची किंमत एक पण असेल तर दोन पण दण्ड, दोन पण असेल तर २०० पण दंड, याच प्रमाणात किमतीच्या वाढीच्या प्रमाणात दंडाची वाढ करावी.") व्यापाऱ्यांनी विक्रीवर किती नफा मिळवावा यालासुद्धा मर्यादा दिली होती. नफेखोर व्यापाऱ्यांना शिक्षा कर-ण्यात येत असे. अनधिकृतपणे मालाचा साठा करणाऱ्या, काळाबाजार करणाऱ्या व्यापाऱ्यांचा मालच जप्त कर-ण्यात येत असे. एकूण हे सर्व अधिकरणच समाज-कल्याणासाठी आवश्यक त्या प्रतिबंधक योजनांचे विवे-चन करण्यात खर्ची पडले आहे असे दिसते.

## मनू आणि समाजकल्याण

मनुस्मृतीतील धर्माचे स्वरूप वर दर्शविल्याप्रमाणे पुष्कळसे समाजकल्याण योजनांवरच आधारलेले आहे. त्यासाठी वापरलेल्या संज्ञांमुळे आपण बिनचूक जातो हे खरे असले तरीपण त्यावेळच्या समाजाला त्यांची नितांत आवश्यकता होती, हे खासच ! पापपुण्यांच्या मानीव कल्पनांवर का होईना पण आधारलेल्या प्रति-बंधक आणि विधायक कार्यांची यादी पाहिली की याची जाणीव होते. समाजद्रोही कारवायांमुळे पाप होते व त्याबद्दल शिक्षा, दंड किंवा प्रायश्चित्त भोगावे लागते, शिवाय पारलौकिक नुकसान होते ते निराळेच, याउलट भूमिसुवर्णादि सत्पात्री दान करणे; देवळे, सरोवरे, विहिरी, धर्मशाळा इत्यादी समाजोपयोगी सत्पात्री कार्ये करणे यामुळे पुण्य प्राप्त होते, नीतिमत्ता उंचावते, शिवाय समाजाची धारणा सुरक्षित होऊन तो प्रगतिपथावर मार्ग आक्रमू लागतो. अर्थात या कल्पना त्या वेळच्या समाजाच्या होत्या, त्याच तंतोतंत त्याच स्वरूपात लागू कराव्यात असा दुराग्रह कोणीही विचारी माणूस धरणारच नाही. पण विधायक स्वरूपाच्या लहानमोठ्या समाजकल्याण योजना त्या प्राचीन काळी-सुद्धा भारतात नैकविध स्वरूपात चालू होत्या हाच मथितार्थ ! *

* केन्द्रसंचालनालय, आकाशवाणी, पुणे यांच्या सौजन्याने.








प्रा. कृ. अ. आचार्य

# मगधचा महापद्मनंद ऊर्फ धनानंद

## जरासंधाचे अपयश

सूत्रग्रंथात मगधातील रहिवाशांना ' व्रात्य ' म्हटले आहे. महाभारतकाली मगधचा राजा जरासंध बलिष्ठ होता. त्याचे चमत्कारिक उत्पत्तिकथेचे तात्पर्य एवढेच की तो शुद्ध क्षत्रिय नव्हता. अनेक क्षत्रिय राजांना त्याने बंदिवासात टाकले होते. गिरिव्रज ही सार्वभौम राजधानी बनविण्याचा त्याचा प्रयत्न श्रीकृष्णासारखा मुत्सदी यादवराजाशी गाठ पडल्यामुळे फसला. शक्ति व युक्ति यांच्या साहाय्याने श्रीकृष्णाने भीमसेन पांडवाच्या हातून त्याचा काटा काढला व मगधला पांडवाचे मांडलिक बनविले. राजकीय केंद्रबिंदु अखेर जरासंधासारखा पराक्रमी राजा असूनही गंगेच्या मध्य खोऱ्यात न जाता गंगेच्या पूर्वखोऱ्यात म्हणजे हस्तिनापूर-इंद्रप्रस्थ इथेच राहिला. पण जरासंधाचा प्रयत्न हा काही मगधचा अखेरचा प्रयत्न नव्हता.

## महाभारतीय युद्ध व त्याचा परिणाम

जरासंधाचे मृत्यूनंतर लवकरच म्हणजे ऋग्वेदकालाचे अखेरीस किंवा ब्राह्मणकालाचे आरंभी, बहुधा इ. स. पूर्व १२०० चे सुमारास संहारक भारतीय युद्ध झाले. यात दूरवरचे प्रदेशातील भारतीय राजांनी भाग घेतला तरी युद्धाचा प्रत्यक्ष भार कुरु, पांचाल, मत्स्य, शूरसेन यांनाच सहन करावा लागला व त्यात त्यांचा भीषण क्षय झाला. कुरु यानंतर काही वर्षांनी त्याचा देश सोडून बहुधा वत्स देशात गेले. यादवांचाही कुलक्षय होऊन मागे फारसे काही उरले नाही. पण कोसल, मगध आदि गंगेच्या मध्य व उत्तर खोऱ्यातील राज्यांची अशी गोष्ट नव्हती. मगध हे पांडवांचे मांडलिक राज्य. त्याने जीव तोडून पांडवांना साहाय्य करण्याचे काय कारण ? सारांश भारतीय युद्धानंतर मध्यदेशातील राजकीय केंद्रबिंदु काहीसा पूर्वदिशेला सरकणे अपरिहार्य होते.

## बौद्धकाल

बौद्ध वाङ्मयावरून इ. स. पूर्व सहाव्या शतकाच्या प्रथमार्धात आपणास भारतात सोळा महाजनपदे होती असे समजते. पण यातील कुरु, पांचाल, मत्स्य, शूरसेन, चेदी या ब्राह्मणकालातील महाबलिष्ठ राज्यांचे महत्व गेले होते. व्रिज्जिका व मल्ल ही मगधाच्या उत्तरभागी व कोसलांचे पूर्वेस गणराज्ये होती. सार्वभौमत्वासाठी इच्छा करणाऱ्या प्रभावी शेजाऱ्यांपुढे त्यांचे विशेष चालण्यासारखे नव्हते. अश्मक हे दक्षिणभागी दूर गोदावरीच्या परिसरातील राज्य होते. तर कांभोज व गांधार ही मध्यदेशांपासून दूर वायव्यभागी असलेली राज्ये सार्वभौमत्वासाठी चालणाऱ्या झगड्यापासून सर्वस्वी अलग अशी होती.

अंग व काशी या राज्यांचा लवकरच अस्त झाला व ती अनुक्रमे मगध व कोसल राज्यात समाविष्ट झाली. तेव्हा इ. स. पूर्व सहाव्या शतकात साम्राज्यसत्तेसाठी होणाऱ्या झगड्यात कोसल, मगध व अवन्ती हीच काय ती प्रतिस्पर्धी राज्ये उरली.

## मगधची वाढ

गौतमबुद्धाचे वेळी मगधदेशात बिंबिसार ( किंवा जैन ग्रंथाप्रमाणे श्रेणिक ) हा राजा होता. हिंदु पुराणे त्याला शिशुनाग वंशातील मानतात तर बौद्ध वाङ्मयाप्रमाणे तो हर्यंक कुलातील होता. त्याची राजधानी जरासंधकालीन ' गिरिव्रज ' हीच होती. त्याचेच कारकीर्दीत अंगदेश मगधात समाविष्ट झाला.

त्याचे नंतर इ. स. पूर्व ४९१ मध्ये त्याचा मुलगा अजातशत्रू हा मगधचे गादीवर आला. त्याने कोसलाधिपती प्रसेनजिताचा पराभव करून काशी राज्यातील काही प्रदेश वापस मिळविला. याशिवाय भेदनीतीचा अवलंब करून उत्तरेचे व्रिज्जिका हे गणराज्य जिंकून घेतले. मगधचे राज्य आता उत्तरेस हिमाल्यापर्यंत वाढले. गंगा व शोण नद्यांच्या संगमावर त्याने पाटलीपुत्राचा बळकट किल्ला बांधला. पुढील उदयभद्राचे कारकीर्दीत याच किल्ल्याजवळ कुसुमपूर ( पाटलीपुत्र ) नगराचा पाया घातला गेला.

यानंतर मगधची वाढ झपाट्न झाली. बौद्ध वाङ्मयात वर्णिलेली पूर्वेकडील सर्व गणराज्ये मगधात समाविष्ट झाली. अवंतीचा महापराक्रमी प्रद्योतानंतरच्या पालक राजाने वत्सदेश जिंकून आपली सरहद्द मगधला भिडविली. अर्थात साम्राज्य-सत्तास्पर्धेत अवन्ती हा मगधला प्रतिस्पर्धी झाला. बहुधा विदुदभाच्या कृत्यांनी सामर्थ्याची हानी झाल्यामुळे असेल, पण कोसल मात्र पुढे या स्पर्धेत मागे पडला.



अनुक्रमणिका

बौद्ध वाङ्मयाप्रमाणे उदयभद्रानंतर आणखी काही पितृघातकी राजे येऊन गेल्यावर ' शिशुनाग ' हा मगधचा दुसरा प्रबळ राजा झाला. त्याने अवन्तीची बलिष्ठ सत्ता नष्ट करून मगधची पश्चिम सरहद्द चर्मण्वतीच्या खोऱ्यापर्यंत नेली. अर्थात मगध आणि सार्वभौमत्वाचे मार्गावर पावले टाकू लागला.

शिशुनागवंशातील शेवटचा राजा कालाशोक ( काकवर्णी शैशुनाग– हर्षचरित्र '– बाण ) हा झाला.

बौद्धवाङ्मयाप्रमाणे कदाचित् अज्ञातशत्रूने बिंबिसाराचा खून केला नसेल, किंवा त्याचे नंतर गादीवर आलेले सर्वच राजे पितृघातकी नसतील, पण एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे की विद्यमान राजाचे नैसर्गिक मरणाची वाट न पाहता त्याला ठार मारून गादीवर येण्याची परंपरा मगधच्या ह्या पहिल्या साम्राज्यात स्पष्टत्वाने दिसते.

' हर्षचरित्रा 'प्रमाणे पाटलीपुत्राचे परिसरात मारेकऱ्याने घशात खंजीर खुपसल्यामुळे कालाशोकाचा अंत झाला. या खुनात खुद्द कालाशोकाचे पट्टराणीचा हात होता. जैन वाङ्मयाप्रमाणे व ग्रीक इतिहासकारांप्रमाणे ह्या खुनाचा सूत्रधार एक न्हावी होता. या न्हाव्याने नंतर कालाशोकाचे राणीशी लग्न करून त्याचे दहा पुत्र ठार केले. याच न्हाव्याचा राणीपासून झालेला पुत्र म्हणजे ' महापद्म ' होय. हा मुलगा त्याला कालाशोकाचे मृत्युनंतर झालेला नसून कदाचित आधीचाच असावा. राणीचे व त्याचे संबंध कालाशोकाचे लक्षात आले असतील म्हणूनच त्याने कालाशोकाचा शेवट केला असावा. मुलाचे वतीने त्याने राज्यकारभार पाहिला व त्याचेनंतर महापराक्रमी महापद्म गादीवर आला.

## महापद्मनंद

शौर्य, महत्त्वाकांक्षा व क्षत्रियांशी विरोध याबाबतीत महापद्म प्रति जरासंधच होता. जरासंधाचे वेळी जसे गंगेच्या पूर्व खोऱ्यात कुरु पांचालांची बलिष्ठ राज्ये होती तशी आता स्थिती नव्हती उलट हर्यंक कुल व त्यानंतरच्या शिशुनाग वंशातील राजांनी मगधला आधीच बलिष्ठ केले होते. अवन्तीचा प्रतिकार संपला होता, कोसल बलहीन होते तेव्हा मगध सार्वभौम करण्याचे काम आता सूकर होते.

महापद्माने शिशुनागांचे उर्वरित कार्य पूर्ण केले. तो क्षत्रिय कुलोत्पन्न नव्हता व त्याचा वंश अनीतीच्या मार्गाने गादीवर आला होता तेव्हा तत्कालीन ब्राह्मण व क्षत्रिय वर्गात व सामान्य जनात त्याचेविषयी तिरस्काराची भावना होती. त्याला ' क्षत्रियांतक ' म्हणतात कारण ' ऐक्ष्वाकू ', ' पांचाल ', ' चेदी ', ' कलिंग ', ' अश्मक ', ' शूरसेन ', ' वीतिहोत्र ' आदि परंपरागत क्षत्रिय कुलांचा त्याने उच्छेद केला. तो दुसरा ' परशुराम ' झाला. कलिंगराजा खारवेल याच्या हस्तिगुंफा येथील आलेखावरून कलिंगदेशही ( किंवा त्याचा काही भाग ) मगध साम्राज्यात मोडत होता. दक्षिणेकडे कुंतल देशापर्यंत त्याची साम्राज्यसीमा गेली होती. मगध साम्राज्य आता मध्य, पूर्व व दक्षिण भारताच्या विस्तीर्ण प्रदेशावर पसरले होते. फक्त पश्चिम व उत्तर भारतच काय तो जिंकावयाचा उरला होता व ते काम त्यानेच वाढविलेल्या लष्करी सामर्थ्याचे बळावर पुढे चंद्रगुप्त मौर्याने पूर्ण केले. बिंबिसारानंतर महापद्म हा मगधचा, मौर्यकाल पूर्वीचा, तिसरा व अखेरचा प्रसिद्ध राजा होय.

महापद्माने सत्ता वाढविली पण त्याचे घराणे, ज्या पद्धतीने सत्तेवर आले ती तऱ्हा व त्याचे हीन कुल यामुळे लोकमनोभूमीत रुजले नाही आणि म्हणूनच चंद्रगुप्त मौर्याचे हातून त्याचा शेवट झाला. अलेक्झँडर व त्याचे सैनिकांचे मनात भीतियुक्त आदर निर्माण करणारी नंदांची सत्ता इ. स. ३२६ नंतर केवळ चारच वर्षांत नष्ट व्हावी याला यापेक्षा दुसरा तर्क संभवत नाही.

## हा धनानंद कोण ?

महापद्माला नंदवंशाचा संस्थापक मानले जाते व त्याचे पुढील पिढीत धनानंद हा राजा होऊन व त्यालाच ठार मारून चंद्रगुप्त मौर्य हा गादीवर आला असे मानण्यात येते. त्याचबरोबर चंद्रगुप्त मौर्य नेमका कोणत्या तऱ्हेने गादीवर आला हेही एकंदरीने स्पष्ट होत नाही. एकंदरीने या कालाचे इतिहासाबाबत काहीशी गुंतागुंत, व अस्पष्टता भासते. ती उकलणे हाच या लेखाचा उद्देश आहे.

यासाठी काही प्रश्न आपण समोर ठेवू. ते असे–
धनानंद व महापद्म नंद यांचा संबंध निश्चित काय ?












नंद नऊ होते हे मान्य, पण ते धनानंदाचे भाऊ की महापद्मनंदाचे भाऊ ? अलेक्झँडरची स्वारी (इ. स. पू. ३२० ते २५) झाली त्यावेळी मगध येथे महापद्मनंद राजा होता की लोकसमजतात– व इतिहास सांगतो– तो धनानंद राजा होता ?

कोणत्याही इतिहासात या प्रश्नांचा नीट खुलासा होत नाही. सर्वसाधारणतः महापद्म वारल्यावर धनानंद झाला, हा नंदवंशातील अखेरचा राजा होता (म्हणजे नक्की कितवा ?) व त्यालाच ठार करून चंद्रगुप्तमौर्य गादीवर आला हे गृहीत धरण्यात येते.

नंद नऊ होते हे बौद्ध धर्मग्रंथात दिले आहे. पुराणांनी महापद्मनंदाला आठ मुले होती हे दिले आहे. म्हणजे नंद एकूण नऊ होते ही संख्या आलीच. 'नंदाः पशव इव हताः पश्यतो राक्षसस्य' यामध्ये नंद अनेक होते हे आलेच.

बौद्धग्रंथात नऊ नंदांचा पहिला भाऊ उग्रसेन हा दिला असून तो लुटारूंचा नायक होता व तोच नंदघराण्याचा संस्थापक असे दिले आहे. त्याचाच शेवटचा भाऊ तो 'धनानंद' होता. म्हणजे बौद्ध वाङ्मयाप्रमाणे धनानंद महापद्माचा भाऊ असून नंदाची एकच पिढी मगधचे गादीवर बसली असे सूचित होते.

अलेक्झँडर इ. स. पूर्व ३२६ मध्ये बियासवर असताना जो गंगेचे खोरे आणि पूर्वेचा राजा होता त्याला Agrammes (अग्रमः) किंवा Xandrames (चंद्रमस्) म्हटले आहे. हा अग्रमः निश्चितच नंदांचा 'अग्रिमः' म्हणजे 'पहिला' ठरतो. त्याचे खरे नांव 'चंद्रमस' असले पाहिजे. अलेक्झँडरला 'पौरव' व चंद्रगुप्तमौर्याने व इतरांनी हे सांगितले होते. तो हीनकुलातील म्हणजे न्हाव्याचा मुलगा होता व त्या न्हाव्याने पूर्वीच्या राजाच्या राणीला विश्वासात घेऊन (कालाशोकाला) ठार मारले होते. आणि त्याच न्हाव्याचा राणीपासून झालेला हा पुत्र होता. ("his father was infact a barber, scarcely staring off hunger by his daily earnings, but who, from his being and uncomely in person, had gained the affection of the queen, &was by her influence advanced to too near a place in the confidence of the reigning monarch. Afterwards, however, he treacherously by murdered his sovereign, and then under the pretence of acting as guardian to the royal children, usurped the supreme authority, and having put the young princes to death begot the present king").

ग्रीक इतिहासकार अलेक्झँडरचे वेळी असलेल्या राजाचे नाव 'धनानंद' मुळीच देत नाही या गोष्टीला फार महत्त्व आहे. ते देत असलेल्या 'अग्रमः' किंवा 'अग्रिमः'चे सैन्य अफाट होते. २० हजार घोडदळ, २ हजार रथदल, २ लक्ष पायदळ व ३ हजार हत्तीदल एवढे त्याचे सैन्यदल होते. अलेक्झँडरला बरोबरीच्या नात्याने लढाई देणाऱ्या झेलमच्या पौरवाचे सैन्य ३० हजार पायदळ, ४ हजार घोडदळ, ३०० रथ व २०० हत्ती एवढे होते. केवळ २०० हत्तीनी पौरवाची आघाडी बराच कालपर्यंत अभेद्य राखण्यात यश मिळविले. तिथे ३००० हत्तींची संख्या ग्रीकांचे छातीत धडकी भरविण्यास समर्थ ठरली हे उघड आहे. इतर सर्व अंगात हे सैन्य वरचढ होते. अलेक्झँडरला खरे सामर्थ्य गंगेच्या खोऱ्यात भेटावयाचे होते. भारतीय शौर्याचा सार्थवारसा यावेळी पंजाब किंवा वायव्य भारतात नसून मध्यदेशात होता. अलेक्झँडरच्या आर्जवांना त्याचे सैनिकांनी ऐकावयाचे नाकारले. बियासवरून ग्रीक सैन्य जे माघारी गेले ते तीन हजार मैल अंतर चालून आल्यामुळे मायदेशी जाण्यास उत्सुक होते हे कारण जितके खरे असेल तितकेच बियासवर नंदाचे नाव प्रभावी होते हेही खरे होय. नंद कुलहीन असतील पण शौर्यहीन नव्हते.

धनानंद हे नाव ग्रीक देत नाहीत ही पहिली महत्वाची गोष्ट व ते देत असलेला 'अग्रिमः' हा 'धनानंद' या नावाने ओळखला जाणारा, धनलोभी, चंद्रगुप्ताचे हातून सहज मारला जाणारा असा शौर्यहीन राजा वाटत नाही. 'अग्रिमः' कुलहीन होता, लोकांच्या घृणेस पात्र होता पण त्याचे सामर्थ्य अफाट होते, त्याचे बळ भीती वाटण्यासारखे होते. हा 'अग्रिमः' तुम्ही आम्ही समजतो तो 'धनानंद' वाटतो का ? आणि इतिहास सांगतो अलेक्झँडर गेल्यावर केवळ चारच वर्षात










ह्या धनलोभी, कंजुष धनानंदाला ठार मारून चंद्रगुप्त गादीवर आला मग ही संगती लावावी कशी ? का 'अग्रिमः' जाऊन लगेच धनानंद आला व लगेच ठारही झाला असे मानावे ? का प्रत्यक्ष ऐकलेले ग्रीकाचे नाव चुकीचे मानावे ? आणि हे नाव ग्रीक इतिहासकारांप्रमाणे खुद्द चंद्रगुप्त-मौर्याने पुरविलेले आहे कारण त्यानेच मगधाची हकीकत (इतराबरोबर) सांगून अलेक्झँडरची मदत मागितली होती.

## हा 'अग्रिमः' खुद्द महापद्मनंदच तर नसेल ?

'अग्रिमः'चा पिता न्हावी होता. पुराणे महापद्माला हीन कुलातील मानतात. पुराणे तो महान पराक्रमी होता असे सांगतात व ग्रीकांनी माघार घेऊन तेच सिद्ध केले आहे. पुराणे त्याला 'महापद्मपति' म्हणतात. म्हणजे 'महापद्म' ह्या संख्येने व्यक्त होणाऱ्या सैन्यांचा किंवा धनाचा 'पति' मानतात. ऐक्ष्वाकू, कुरु, पांचाल चेदी, शूरसेन आदि गंगेच्या सुपीक खोऱ्यातील राज्यांच्या नाशाने तेथील कोषाने तो 'महापद्मपति' होणे साहजिकच होते व ते नाव सार्थ करणारे त्याचे बलाढ्य सैन्यही होते, त्याचे हीन कुलावरून व परंपरागत क्षत्रिय कुलांच्या त्याने केलेल्या नाशावरून त्यावर नाराज असलेल्या जनतेवर त्याने कर बसवून आपले समाधान केले असेल'ही. महापद्मपती' चे हे वर्णन धनानंदाला जुळत नाही काय ? 'महापद्म' एवढ्या धनाचा पति 'धनानंद' ठरत नाही काय ? व 'महापद्मपतीच्या' पराक्रमावरून व हीन कुलावरून तो ग्रीक देत असलेला 'अग्रिमः' म्हणजे आद्य नंद ठरत नाही काय ? या 'अग्रिमः 'चे खरे नाव ग्रीक देत असल्याप्रमाणे 'चंद्रमस' (Xandrames) असावे. जो 'अग्रिमः' तोच 'महापद्मनंद' व तोच 'धनानंद' हे स्पष्ट आहे.

पुराणांनी त्याची माता हीन कुलातील होती असे म्हटले आहे तर जैन ग्रंथकार व ग्रीक इतिहासकार त्याचा पिता हीन कुलातील होता असे म्हणतात. व हे अधिक योग्य दिसते. पिता हीनकुलातील असल्यामुळे त्याचे क्षत्रियत्वच गेले व तो 'धर्मबाह्य' ठरला. म्हणूनच क्षत्रियकुलांचा वारसा सांगणाऱ्या पण बलहीन झालेल्या सर्व क्षत्रियकुलाचा त्याने शेवट केला. पण परिणामी त्यांचे विषयीचा सर्व थरात तिरस्कार अधिकच वाढला व याचाच फायदा निश्चितपणे चंद्रगुप्तास मिळाला.

चाणक्य हा कोणी शेंडीधारी भोजनप्रिय ब्राह्मण नसून नंदाची 'धनशाळा' ही दान देणारी संस्था चालविणाऱ्या 'संघाचा' तो अध्यक्ष होता. त्याला एक कोटी नाणी दान देण्याचा अधिकार होता. या पदावर असताना त्याचा व नंदराजाचा खटका उडाला व म्हणून या कुलहीन व धर्मबाह्य नंदाचा उच्छेद करण्याची त्याने प्रतिज्ञा केली. यासाठी त्याने 'चंद्रगुप्त' ह्या क्षत्रिय राजपुत्रास हाताशी धरले. अर्थात ह्या 'धर्मसंमत' राजक्रांतीस सामान्य तसेच वरिष्ठ वर्गाचा पाठिंबा होता हे उघडच आहे.

## इ. स. पूर्व ३२२ ची राजक्रांति

पुढील कालातील 'मिलिंदपन्हो' ग्रंथाप्रमाणे प्रचंड युद्ध होऊन व त्यात कबंधे नाचण्याइतकी कत्तल होऊन चंद्रगुप्त गादीवर आला हे संभवनीय वाटत नाही. २ लक्ष पायदळ, २ हजार रथदळ, ३ हजार हत्ती व 'महापद्म' इतके धन कोषात असताना त्याचबरोबर लढाई देऊन मगधची गादी हस्तगत करण्याची चंद्रगुप्ताची शक्ति खासच नव्हती. किंवा अलेक्झँडरनंतर केवळ चारच वर्षात हे सर्व नष्ट झाले अशीही कल्पना करण्याचे कारण नाही. चंद्रगुप्त हा आरंभी सैन्याचा अधिकारी होता व चाणक्य हा 'संघाचा' अध्यक्ष असण्याइतका राजकारणाशी निकट होता. काहीच लढाई झाली नसेल असे नाही पण मुख्यतः ज्या मार्गाने कालाशोक गेला त्याच मार्गाने 'महापद्म' उर्फ 'धनानंद' गेला. हे अंतःपुरातीलच कारस्थान असावे. काही स्वामीनिष्ठ सैनिक लढले असतील पण नंदांचा पशूप्रमाणे वध झाला हे निश्चित. सामाजिक व धार्मिक पाठबळ व मुत्सद्यांची कूटनीति यांनी काम होऊन मुख्य सैन्यच चंद्रगुप्तास अनुकूल झाल्यावर 'क्षत्रियांतक' महापद्माचा इ. स. पूर्व ३२२ मध्ये पाटलीपुत्र येथे मुलांसह (किंवा भावांसह) क्रूर अंत झाला.

चंद्रगुप्तमौर्याने नंतर पश्चिम व उत्तरभारत जिंकून पहिले भारतीय साम्राज्य स्थापन केले त्यासाठी महापद्माचेच सैन्य व कोषागारातील धनराशी उपयोगी पडल्या व त्या साम्राज्याची प्रतिष्ठापना गंगेचे खोरे, कलिंग व दक्षिणदेश जिंकून महापद्माने केली होती हे नाकारता येईल काय ?











अनुक्रमणिका

श्री. सुभाषचंद्र देसाई

# घटनादुरुस्तीच्या निमित्ताने

## चांदोब्याचा अंगरखा

सध्या घटनादुरुस्तीबाबत बरेच वाद माजले आहेत. 'घटनेपेक्षा घटनादुरुस्त्याच मोठ्या' हा सूर सारीकडे ऐकू येतो. त्या वादात न पडणे श्रेयस्कर. भारतात घटनेव्यतिरिक्त जन्मसिद्ध हक्क कोणालाही दिले गेलेले नाहीत. बाकीच्या देशात घटनेत लिहिलेले हक्क हे दृष्टांतादाखल [ Illustrative ] नमूद केलेले असतात. त्यामुळे प्रत्येक प्रकरणात न्यायर्षी भाष्ये करतात व या भाष्यामुळे घटनेत आपोआप बदल घडवला जातो. या बदलाची नोंद मात्र कुणी चटकन् लक्षात घेत नाही. इंग्लंडमध्ये तर या भाष्यामुळेच घटना तयार केली गेलेली आहे. राज्यकर्त्यांनी मात्र घटनादुरुस्तीचा प्रस्ताव आणला की मग सारीकडे वादळ उठते! भारतीय घटना ही सर्वस्वी लेखी असल्यामुळे काही काही प्रसंगी बदल करणे आवश्यक ठरते. अमेरिकेत अगर इतर देशात विशेष गाजावजा न होता घटना दुरुस्त होत रहात असते हाच फरक. घटनेबद्दल सांगायचे म्हणजे की ती म्हणजे 'चांदोब्याचा अंगरखा!' चांदोब्याला अंगरखा कधी व्यवस्थित होतच नसतो. एकदम घट्ट किंवा एकदम सैल. तद्वतच या घटनेचे! भिन्नरुचि व क्षणोक्षणी बदलणाऱ्या समाजाला एकत्र ठेवणारी ही रेशमी रश्मी वारंवार बदलावी लागतेच.

भारतात सध्या होऊ घातलेल्या घटनादुरुस्तीबाबत विचार करताना अमेरिकेतील होऊ घातलेल्या घटनादुरुस्तीचा विचार करावा या हेतूने हा लेख लिहीत आहे. घटनादुरुस्तीच्या गुणवत्तेबद्दल कोणतेही मतप्रदर्शन करण्याची कक्षा व कांक्षा लेखकाची नाही हे आग्रहाचे सांगणे.

अमेरिकेतील सध्या जी घटनादुरुस्ती होऊ घातली आहे, ती जर संमत झाली तर घटनाशास्त्रात फार मोठे पर्व उघडणार आहे यात शंका नाही. ही दुरुस्ती सुचविली आहे कुणी तर नॅशनल लेजिस्लेटिव्ह कॉन्फरन्स या परिषदेने! नॅशनल लेजिस्लेटिव्ह कॉन्फरस ही परिषद् Council of state Govts. राज्यमहामंडळ या विधियुक्त ( statutory body ) संस्थेचा एक भाग. १९३३ साली Council of state governments ही संस्था स्थापन झाली. या संस्थेचा उद्देश असा: "to assist the states in improving their legislative, administrative, and judical practices, to promote inter-state cooperation and to facilitate and improve state-local and state-federal relations" आणि या संस्थेत प्रत्येक राज्य विधिमंडळाचे प्रातिनिधिक सदस्य, प्रत्येक राज्यातील नैयायिक, विचारवंत असे लोक असतात. वर्षातून दोनदा या संस्थेचे अधिवेशन भरते. व गेल्या डिसेंबर १९६२ मध्ये शिकागो येथे हे अधिवेशन झाले. व या अधिवेशनात घटनेत तीन दुरुस्त्या करावयाच्या असे ठरले. आणि त्याप्रमाणे घटनेतील दुरुस्ती संमत होणे बाबत देशव्यापी चळवळ सुरू झाली आहे.

या दुरुस्त्या एकूण तीन आहेत:

( १ ) घटना दुरुस्तीच्या कलमातील दुरुस्ती.

( २ ) राज्य सरकारनी केलेल्या कायद्यावर, केंद्राचे जे सुप्रीम कोर्ट आहे ते काही वेळेवर वैध-अवैधतेबाबत निकाल देते, त्या सुप्रीम कोर्टाच्या अधिकारांवर मर्यादा घालण्याबाबत.

( ३ ) सुप्रीम कोर्टाने आतापर्यंत राज्य सरकारच्या काही काही कायद्यांबाबत जे निर्णय दिले आहेत, ते बरोबर आहेत की नाही हे पाहणेकरता एक Court of the Union निर्माण करणे बाबत.

१ जानेवारी १९६५ पर्यंत या दुरुस्त्यांचा अमेरिकन कॉंग्रेस विचार करीलच. १४ फेब्रुवारी १९६३ रोजी साऊथ केरोलिनाच्या सिनेटर थुरमोंडजी सीनेट जॉइंट रिझोल्यूशन म्हणून हा सीनेटमध्ये दुरुस्तीचा ठराव आणला आहे व 'कमिटी ऑन ज्युडिशियरी' या सिनेटच्या समितीपुढे तो ठराव विचारार्थ व योग्य त्या

शिफारशीसाठी ठेवला आहे. तसेच हाऊस ऑफ् रिप्रेझेन्टेटिव्हस् मध्ये फ्लोरिडा राज्याचे श्री. हरलॅग यानी हा दुरुस्तीचा प्रस्ताव मांडलेला आहे व जवळजवळ साऱ्या राज्यांच्या विधिमंडळात हा दुरुस्तीचा प्रस्ताव चर्चेला आला आहे. व केनेडींच्या हत्येची दुर्घटना झाली नसती तर १ जानेवारी १९६४ पर्यंतसुद्धा अमेरिकेची घटना बदलल्याचे दिसले असते. पण लवकरच घटनादुरुस्ती होईल हे निश्चित.

## दुरुस्तीकलमातील दुरुस्ती !

( १ ) घटनादुरुस्तीच्या कलमातील दुरुस्ती– सर्वसाधारण राज्यशास्त्रीय संकेत असा असतो की घटनेत कितीही दुरुस्ती सुचवा पण घटनादुरुस्तीच्या कलमाला ( Amendment clause ला ) शक्यतो स्पर्श करायचा नाही. पण लोकांकरता, लोकांसाठी, लोकांनी चालवलेल्या राज्यात या संकेताला आता काही स्थान राहिले नाही हे उघड.

घटनादुरुस्तीचे कलम आहे ५ वे. अमेरिकेची घटना एकूण आहे सात कलमांची. व १७९१ पासून १९५१ पर्यंत दुरुस्त्या या घटनेत झाल्या. सर्व घटना या अमेरिकन कॉंग्रेसनेच घडवून आणल्या. घटनादुरुस्ती करायची झाली तर दोन्ही सभागृहाच्या $\frac{2}{3}$ संख्या असलेल्या सदस्यानी प्रस्ताव संमत करून घ्यायचा व नंतर तो प्रस्ताव राज्याच्या कमितकमी $\frac{3}{4}$ राज्यविधिमंडळांनी, मान्यता देऊन पास करावयाचा. तरच ती घटनादुरुस्ती कायदेशीर. याच्याउलट $\frac{2}{3}$ राज्यसरकारानी एक घटनादुरुस्तीचा ठराव आपापल्या विधिमंडळातून संमत करून घेतला तर तो अमेरिकन कॉंग्रेसपुढे पाठवायचा व दोन्ही सभागृहांनी $\frac{2}{3}$ गणसंख्येने तो संमत करायचा. थोडक्यात घटनादुरुस्ती करताना राज्य व केंद्र या दोन्ही विधिमंडळांना परस्परांच्या सहकार्याविना पुढे पाऊल टाकता येऊ नये हा त्यावेळच्या घटनाकारांचा दृष्टिकोन ! "संगच्छध्वं" हा मंत्र. किंवा चाणक्यनीतीतील शब्द घ्यायचा झाला तर घटनादुरुस्ती ही एक "उभयायत्तसिद्धी" होती. दोघांच्या पूर्णपणे ताब्यात असलेली गोष्ट होती !

पण आता जी दुरुस्ती हवी आहे ती अशी– जर राज्य सरकारांतील $\frac{2}{3}$ राज्यांनी घटनादुरुस्तीबाबत एक विधेयक आपापल्या विधिमंडळातून संमत करून घेतले तर केंद्राची अनुमती, सल्ला अगर आदेश न घेता ही घटनादुरुस्ती मान्य होऊ शकेल. अमेरिकन कॉंग्रेसने त्यावर पुन्हा विचार करण्याचे कारण नाही. अमेरिकन कॉंग्रेसची दोन गृहे आहेत : ( १ ) हाऊस ऑफ रिप्रेझेन्टेटिव्हस्– या गृहांतले प्रतिनिधी लोकसंख्येप्रमाणे निवडलेले असतात. व ( २ ) सीनेट; या सीनेटमध्ये प्रत्येक राज्ये ही प्रतिनिधी पाठवत असतात. व राज्याचा विस्तार कसाही व केवढाही असो सीनेटमध्ये प्रत्येक राज्याला एकच मत असणार. या सीनेट व हाऊस ऑफ् रिप्रेझेन्टेटिव्हस पुढे राज्यसरकारनी संमत केलेली दुरुस्ती यावयाची नाही व त्यांना घटनेतील बदलावर– मग तो कितीही मोठा असो– काहीच मत नोंदवता यायचे नाही.

हा दुरुस्तीचा ठराव आपल्या विधिमंडळात संमत झाला की प्रत्येक राज्यानी अमेरिकन कॉंग्रेसकडे धाडायचा. व प्रत्येक राज्याचे ठराव एकाच तऱ्हेचे आहेत की कसे हे फक्त राष्ट्राध्यक्षानी पाहायचे. एकवाक्यता दिसली की तसे प्रमाणपत्र राष्ट्राध्यक्षांनी द्यायचे आणि प्रमाणपत्र दिल्यावर तो घटनाकायदा ठरणार.

अमेरिकन कॉंग्रेसला घटनादुरुस्तीचे अधिकार आहेतच. पण घटनादुरुस्ती अमेरिकन कॉंग्रेसने जरी पास केली असली तरी राज्यसरकारनी २/३ मतांनी ती मान्य करायला हवी. हा घटनादुरुस्ती कलमातील भाग तसाच राहिला आहे. मुख्य बदल आहे तो राज्यसरकारनी सुचवलेल्या बदलाबाबत ! राज्यसरकारनी सुचवलेल्या बदलाबाबत कॉंग्रेसला विचार करणेचा अधिकार ठेवलेला नाही हा घटनादुरुस्ती कलमातील बदल अमेरिकन बार असोशिएशनला संमत नाही. पण १७ राज्य विधिमंडळांनी या बदलाला आतापर्यंत मान्यता दिली आहे.

या दुरुस्तीकलमातील दुरुस्तीचे परिणाम काय होतील हे भविष्य करणे चुकीचेच. पण घटनाशास्त्रात बाकी एक नवे पर्व उघडले जाईल. भारतात पार्लमेंट बऱ्याचवेळी घटनादुरुस्ती करीत असते ही टीका करणाऱ्यानी, अमेरिकेत घटनादुरुस्ती करताना पार्लमेंटचा विचारही घेऊ नये हा प्रवाह जोरात वाहतो आहे हे लक्षात घ्यावे !








(२) सुप्रीम कोर्टाच्या अधिकारावर मर्यादा घालणेबाबत :– अमेरिकेत प्रत्येक राज्याची एक स्वतंत्र घटना आहे. व प्रत्येक राज्याचे स्वतंत्र सुप्रीम कोर्ट आहे. या सुप्रीम कोर्टाच्या न्यायर्षीची दरवर्षी एक बैठक भरते. या बैठकीत असा सूर निघाला की अमेरिकन सुप्रीम कोर्ट– ज्या न्यायर्षीना Lions under the throne असे संबोधतात– हे रुद्रातील चमकानुवाकाप्रमाणे "ज्येष्ठ्यं च मे आधिपत्यं च मे... मंतिश्च मे सुमतिश्चमे" असे म्हणत म्हणत प्रत्येक राज्यसरकारच्या अंतर्गत राज्यकारभारात अप्रत्यक्षपणे हस्तक्षेप करीत असते. या न्यायर्षीच्या बैठकीत एक अहवाल तयार केला गेला : Report of the Committee on Federal State Relationships as Affected by Judicial Decisions. या अहवालात अमेरिकन सुप्रीम कोर्ट राज्याच्या अंतर्गत कारभारात काही काही गोष्टींवर निर्णय देऊन कसकसा हस्तक्षेप करते हे सोदाहरण दाखविले. आहे. ही घटनादुरुस्ती लक्षात घेतेवेळी भारतातील परिस्थिती लक्षात घ्यायला हवी. भारतात सुप्रीम कोर्टाकडे फक्त तुमचा हक्कभंग झाला तरच घटनेच्या कलम ३२ प्रमाणे दाद मागता येते. हायकोर्टाकडे दाद मागता येणेसाठी अन्याय झाला आहे एवढे दाखवले तरी पुरते. हायकोर्टाला २२६ व २२७ कलमाप्रमाणे कोणत्याही अधिकाऱ्याविरुद्ध व व्यक्तीविरुद्ध मनाई हुकूम स्वतःच्या निरीक्षण अधिकारात (power of superintendence) बजावणेत येतो. सुप्रीम कोर्टाला तसा विशेष अधिकार दिला गेलेला नाही. अगदी तशीच पण अलिखित परिस्थिती अमेरिकन सुप्रीम कोर्टाबाबत आहे. अमेरिकेच्या सुप्रीम कोर्टाला 'न्यायालयीन निरीक्षणाखाली (superintendence) हक्कभंग झाला नसता, केसिस् ऐकण्याचा अधिकार नाही असे साऱ्यांचे म्हणणे. पण असे असूनसुद्धा अमेरिकन सुप्रीम कोर्ट दंनदिन कारभारात हस्तक्षेप करते असा प्रवाद आहे. १९६२ साली. Baker v/s carr या केसमध्ये सुप्रीमकोर्टाने टेनेसी राज्याच्या कारभारात हस्तक्षेप केला. टेनेसी राज्याने आपल्या विधिमंडळाची पुनर्रचना करणेचे ठरवले. व विधानसभेत कोणकोणत्या भागाला किती किती प्रतिनिधी राखून ठेवायचे याचा विचार करायला सुरुवात केली. स्वतःचे विधिमंडळ, स्वतःचे नागरिक (अमेरिकेत द्विदल नागरिकत्व आहे) याबाबत कारभार करण्याचा टेनेसी राज्याला अधिकार होता. पण याबाबत सुप्रीम कोर्टाने तक्रार ऐकून घेतली व राज्याच्या अंतर्गत कारभारावर आपले न्यायालयीन नियंत्रण आहे हे दाखविले.

सुप्रीम कोर्टाचे न्यायर्षी हे राष्ट्राध्यक्षांनी निवडलेले असतात. त्यांची नियुक्ती त्यांच्या गुणवत्तेमुळे झालेली असते हे जरी खरे असले तरी ज्यांच्यावर त्यांची सत्ता चालते अशा लोकांना ते पसंत असतातच असे नाही. राज्यकर्ते हे लोकांनी निवडलेले असतात व लोकांनी निवडलेले हे राज्यकर्ते केवळ लोकांच्या चांगल्यासाठीच राज्यकारभार करत असताना, लोकांपासून योजनेच्या योजने दूर असलेल्या न्यायर्षींनी त्यांचेवर नियंत्रण का ठेवा ?

आणि याकरता सुप्रीम कोर्टाने निदान विधिमंडळातील वर्गीकरणाबाबत लक्ष घालू नये अशी घटनादुरुस्ती.

"The Judicial Power of the United states shall not extend to any suit in law or equity, or to any controversy, relating to the apportionment of representation in a state legislature."

अशी ही दुरुस्तीची परिभाषा.

या संदर्भात एक लक्षात ठेवायचे की भारतातील सुप्रीम कोर्ट हे 'Union Judiciary' या घड्याखाली घटनेत लिहिले गेले असले तरी ते कोर्ट ठराविक संस्थेचे अगर अधिकाऱ्याचे आहे असे काही ध्वनित होत नाही. कलम १२४ असे म्हणते की 'There shall be a supreme court of India...' पांचवा धडा High Courts in the states या नावाने सुरू होतो. कलम २१४ असे आहे There shall be a High Court for each state. त्यामध्येसुद्धा हायकोर्ट हे कुणाच्या तरी शक्तीचे प्रतीक आहे असा अर्थ निघत नाही.

अमेरिकेच्या घटनेचे तिसरे कलम मात्र भाषा निराळी वापरते.

The Judicial Power of the United States shall be vested in one supreme Court......








यातील पॉवर मधील P पहिल्या लिपीचा आहे हे ध्यानात राहू द्या. त्यामुळे सुप्रीम कोर्ट हे केंद्राच्या न्यायिक शक्तीचे निधान आहे अर्थात् केंद्राच्या बाजूनेच सर्वसाधारण या सुप्रीम कोर्टाचा कल असतो अशी सर्वसाधारण समजूत, अमेरिकेत दृढ करून राहिली आहे. जसे भारतातील फौजदारी न्यायालयात आरोपी हा निर्दोषी आहेच अशी समजूत दृढ धरून केसच्या चौकशीची सुरवात होते तशीच समजूत पण निराळी– म्हणजे केंद्राला प्रत्येक गोष्टीत हस्तक्षेप करता येतोच– अशी समजूत सुप्रीम कोर्टाच्या न्यायर्षींची असते. असे सर्वसाधारण मत आहे.

केनेडींच्या हत्येची कारणे अनेक असोत पण केनेडीनी अधिकारसूत्रे घेतल्यापासून केंद्राचे वर्चस्व दिवसेंदिवस वाढत होते हे मात्र निश्चित. व त्यामुळे दक्षिणी राज्यात त्यांचेबद्दलचा हेवा व मत्सर वाढत होता. केंद्राचे वर्चस्व कमी व्हावे म्हणून घटनादुरुस्ती सुचवली खरी. पण सुप्रीमकोर्टाचेमार्फत काहीतरी बडगा मिळायचा याकरता सुप्रीम कोर्टाची नखे काढलेली बरी म्हणून ही दुरुस्ती आहे, असे काहींचे म्हणणे. असो. कारण सुप्रीमकोर्ट किती झाले तरी केंद्राचेच अशी समजूत !

( ३ ) कोर्ट ऑफ् युनियन– या दुसऱ्या दुरुस्तीमुळे काही संपणार नाही असे वाटूनच की काय तिसरी दुरुस्ती सुचवली गेलेली आहे. राज्यांच्या अधिकारातील ज्या गोष्टी आहेत त्यावर आतापर्यंत जे सुप्रीम कोर्टाने निकाल दिले आहेत त्या निकालाची फेरतपासणी करणेकरता एक विशेष कोर्ट नेमणेची तरतूद करायची असा या दुरुस्तीचा रोख.

१७९१ साली अमेरिकन घटनेत दहा दुरुस्त्या झाल्या त्यातील दहावी दुरुस्ती अशी :

The powers not delegated to the United states by the constitution, nor prohibited by it to the states, are reserved to the states respectively or to the people.

या दुरुस्तीमुळे राज्यसरकारचे क्षेत्र मोठे झाले खरे पण सुप्रीमकोर्टाच्या न्यायालयीन निरीक्षणामुळे या क्षेत्रात संचार करताना प्रत्येक राज्याला भीतभीतच संचार करावा लागे. जर प्रकरण सुप्रीमकोर्टात गेले आणि निकाल उलटा लागला तर राज्यसरकारला काही करता येणे अशक्यच. फारतर अमेरिकन काँग्रेसपुढे दाद मागायची; आणि तो मार्ग भलताच त्रासाचा ! याकरता हे कोर्ट ऑफ युनियन.

कोर्ट ऑफ युनियनचे सदस्य हे प्रत्येक राज्याचे चीफ जस्टिसिस असणार. व या कोर्टातर्फे राज्यसरकार व केंद्र यांचे दहाव्या दुरुस्तीमुळे राज्यांकडे आलेल्या क्षेत्रात ( Lists ) जे वाद होतील ते या कोर्ट ऑफ दि युनियनने मिटवायचे. सुप्रीमकोर्टाने नाहीत ! कारण आतापर्यंतचे सारे निर्णय केंद्राच्याच बाजूने लागले आहेत ! पण आतापर्यंतचे सर्वच निकालांची फेरतपासणी करायची म्हणजे जिकीरीचे. याकरता बरीच भवति न भवति होऊन खालील शब्दात ही दुरुस्ती अमेरिकन घटनेत येऊ घातली आहे :

Section, Upon demand of the legislature of five states no two of which shall share any common boundary, made within two years after the rendition of any judgment of the Supreme Court relating to the rights reserved to the states such judgment shall be reviewed by a Court composed of the chief justices of the highest courts of the several states to be known as the Courts of the Union. The sole issue before the Court of the Union shall be whether the power or jurisdiction saught to be exercised on the part of the United the states is a power granted to it under this constitution.

बाकीची कलमे तेवढी महत्त्वाची नाहीत. राज्यसरकारच्या क्षेत्रात जर केंद्राने हस्तक्षेप केला तर सुप्रीम कोर्टाकडे केस नेली तर सुप्रीम कोर्ट केंद्राला अनुकूल असा निकाल देण्याची शक्यता फार. याकरता हे कोर्ट ऑफ दी युनियन. या कोर्टापुढे विचारार्थ मुद्दा राहील तो हा की ' केंद्र सरकारला ( पर्यायाने








केंद्राच्या सुप्रीम कोर्टाला ) हस्तक्षेप करण्याचा अधिकार आहे का?"

– असो. वरील तीन बदल घटनेत हा लेख प्रसिद्ध होताना आलेले असतील. या दुरुस्त्या करण्याबाबत अमेरिकन काँग्रेसने दोन्ही सभागृहाचे विशेष अधिवेशन भरवावे अशी सूचना National Legislative conference ने केलेली आहे. प्रत्येक दुरुस्तीला खालील पुस्ती आहेच.

The article shall be inoperative unless it shall have been ratified as an amendment to the constitution by the legislatures of three-fourths of the several states within seven years from the date of its submission.

या पुस्तीवर विसंबून न राहाता मगाशी सांगितलेच आहे, प्रत्येक राज्याने आपआपल्या विधिमंडळातून या दुरुस्त्या मंजूर करवून घेतल्या आहेत व लवकरच अमेरिकन काँग्रेसपुढे या येणार आहेत. असो.

काहींचे म्हणणे असे आहे की केंद्र व राज्ये यांचे संबंध या घटनादुरुस्त्यामुळे जास्त घट्ट होणार आहेत. तर काहींचे म्हणणे "पुन्हा आपण जंगलात शिरलो." जंगलाचा कायदा म्हणजे प्रत्येकजण स्वतंत्र झाला व केंद्राला कुणी पुसेनासे झाले. या दोन्ही गोष्टीचा विचार वाचकांनी करायचा.

आपल्याकडे घटनादुरुस्ती चालली आहेच. पण सुबत्ता, व भारतापेक्षां सर्वस्वी चांगल्या स्थितीत असलेल्या व लोकशाहीत रुजलेल्या देशालाही घटना दुरुस्तीची निकड लागली आहे हे लक्षात यावे याकरता ही माहिती दिली आहे.

---

**चुकीची दुरुस्ती —**

'नवभारतातून' प्रसिद्ध झालेल्या (मार्च १९६४ अंकात) 'आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना (उत्तरार्ध) या लेखात पृ. ४२ वर पहिल्या कॉलममध्ये 'ही मते' या शब्दानी सुरवात होणाऱ्या परिच्छेदात ११ व्या ओळीत "प्रस्तुत लेखकाने सिंधुसंस्कृति हीच वेदात वर्णन असलेल्या **आर्यांची** संस्कृति होय व आर्यांच्या संघर्षामुळे तिचा विनाश झाला हे दाखवून दिले.' असे चुकीने छापले गेले आहे. आर्यांची या शब्दा ऐवजी '**आर्यांच्या शत्रूंची**' अशी दुरुस्ती पाहिजे.

**– प्र. रा. देशमुख**





अनुक्रमणिका








प्रा. रा. ग. जाधव

# रे. बाबा पद्मनजीकृत ‘अरुणोदय’ नि वाचकांच्या समस्या !

## ‘अरुणोदय’ची प्रस्तावना

रेव्हरंड बाबा पद्मनजी यांनी १८७९ साली आपल्या धर्मांतराची माहिती देणारा ‘अरुणोदय’ हा ‘ग्रंथ’ रचला. या ग्रंथाला त्यांनी एक प्रस्तावना लिहिली आहे व तीत या ग्रंथरचनेच्या विविध साधनांची चिकित्सा करून एकंदरीत हे ग्रंथलेखन किती अवघड होते हे सुचविले आहे. ‘अरुणोदया’चे लेखन कष्टाचे आहे हे या प्रस्तावनेवरून वाचकाला सहजपणे पटते. आणखी एक गोष्ट वाचकाला पटलेली असते. ती अशी की, या ग्रंथाचे लेखन जितके अवघड व जिकिरीचे आहे, तितकेच या ग्रंथाचे वाचनही अवघड व जिकिरीचे आहे. दुर्दैवाने वाचकाला अशा प्रकारच्या ग्रंथाला प्रस्तावना वा पुरवणी जोडण्याची संधी नसते. व म्हणून वाचकाच्या अडचणी पुष्कळदा अशा प्रकारच्या ग्रंथाभोवती अदृश्यपणे घोंगावत असतात. या अडचणी नमूद करण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

वाचकाच्या अडचणी कदाचित अगोदरच या लेखकाने जाणल्या असाव्यात म्हणून की काय, ‘अरुणोदया’च्या निवेदनामागील आपला हेतु कोणता हे बाबा पद्मनजींनी प्रस्तावनेतच नमूद केले आहे. तो असा : “आता हे पुस्तक लिहिण्याचा मुख्य हेतु सांगितला पाहिजे. तो हाच की एका दीन पाप्यावर ईश्वराने जी परम दया केली तिचे वर्णन करावे, आणि ते वाचून त्याजसारख्या इतर पाप्यांनी त्या दयेचा अनुभव घ्यावा व ज्यास असा अनुभव झाला आहे, त्यांनी तिचा महिमा गावा.”

या प्रयोजनाची सोबत घेऊन ‘अरुणोदया’च्या धूसर वातावरणात वाचकाला प्रवेश करावा लागतो. बाबा पद्मनजी यांनी या हेतुनिवेदनात स्वतःला जी विशेषणे लाविली आहेत, तीच ‘अरुणोदया’च्या वाचकालाही लावण्याचा प्रयत्न केला आहे. लेखकाला जो अनुभव आला तोच वाचकालाही यावा. कदाचित वाचकाला तो ‘अरुणोदय’ वाचण्यापूर्वीच आला असेल तर त्याने त्या अनुभवाचा महिमा गावा (—म्हणजे पुन्हा ‘अरुणोदय’ यासारखे ‘ग्रंथ’ लिहावयाचे की काय हे कळत नाही !).

या प्रयोजनावरून जी गोष्ट जाणवते ती अशी की, हा ‘अरुणोदय’ ग्रंथ धार्मिक इतिवृत्त (—मग ते धर्माच्या वर्तनाचे असो वा धर्माच्या परिवर्तनाचे असो !) कथन करणारा आहे. व म्हणूनच या धर्मग्रंथाचे प्रयोजनही काहीसे पारमार्थिकच आहे. स्वतः लेखकानेच आपल्या ग्रंथाला व ग्रंथवाचकांना या प्रकारे पारमार्थिक विशेषणांनी सीमित केले आहे. जो ईश्वराभिमुख पापी माणूस तोच व तेवढाच या ग्रंथाचा वाचक व जो ईश्वराभिमुख पण पापी नाही तो यासारख्या ग्रंथाचा लेखक असे काहीसे बाबा पद्मनजींना या प्रयोजनावरून सुचवायचे असावे असे वाटते.

## पापी नसलेल्या वाचकाची अडचण

माझ्यासारख्या वाचकाची पहिली अडचण या ग्रंथहेतूच्या बिंदूपाशीच निर्माण होते. म्हणजे मी पापी नाही असे मला म्हणावयाचे नाही. मला ईश्वराच्या दयेची जरूरी नाही असेही मला सुचवायचे नाही. माझ्यासारख्या वाचकाची खरी अडचण एवढीच असते की, या ग्रंथाचे वाचन करताना मी माझ्या पापपुण्याचे गाठोडे बाजूला दूर अंतरावर ठेवलेले असते. खरी गोष्ट अशी असते की, मी जेव्हा वाचक असतो, तेव्हा मी फक्त वाचकच असतो. माणसाला एकाचवेळी एकच भूमिका चांगली व यथार्थ वठविता येते, ही व्यवहारातील खरी गोष्ट वाङ्मयाच्या क्षेत्रात तर अधिकच खरी आहे. मी जेव्हा कोणतेही ललित वाङ्मय वाचत असतो, तेव्हा मी मोठ्या कष्टाने नि अभ्यासाने साध्य केलेले माझे वाचकव्यक्तित्व फक्त जागृत ठेवलेले असते. अशावेळी मी पापी वा पुण्यवान, नास्तिक वा आस्तिक, हिंदू धर्मीय वा ख्रिस्ती धर्मीय असा कोणीही नसतो. जेव्हा मी या प्रकारची एखादी भूमिका घेतो, त्यावेळी माझ्या पुढ्यात

वेगळे पुस्तक, वेगळा ग्रंथ असतो. माझे धार्मिक व्यक्तित्व जागृत ठेवून मी भगवद्गीता वाचतो, किंवा कुराण वाचतो अथवा बायबल वाचतो. स्वतः बाबा पद्मनजींनी पाप-पुण्याचा व ईश्वरी दयेचा शोध करताना 'अरुणोदया' सारखा कोणताही ग्रंथ वाचला नव्हता, हे त्यांच्याच आत्मवृत्तावरून सहज लक्षात येईल. त्यांनी बायबल वाचले, धार्मिक व्याख्याने ऐकली व दिली. आता कुणा वाचकाला 'अरुणोदय' वाचताना आपण बायबलच वाचत आहोत, असा अनुभव येत नसेल असे नाही. पण हा अपवादात्मक वाचक होय. व अशा वाचकाच्या वैशिष्ट्यांची मला तरी मुळीच माहिती नाही. धर्मांतरासारख्या महत्त्वाच्या व मौलिक विषयासंबंधीचे आत्मानुभव व्यक्त करणारा हा ग्रंथ आहे व म्हणूनच या ग्रंथाविषयी आपणाला कुतूहल असते.

## रेव्हरंडकृत रेव्हरंड-प्रशस्ति !

तेव्हा खुद्द लेखकाचेच बोट धरून या ग्रंथाचे आकलन करणे हे सर्वसामान्य वाचकाला अवघड आहे, हे उघडच आहे. या ठिकाणी एक संभाव्य शंका व्यक्त केली पाहिजे. ही शंका नमूद करण्याअगोदर, तिची पार्श्वभूमि म्हणून रे. ना. वा. टिळक यांनी 'अरुणोदया'ला जोडलेल्या पुरवणीतील काही मजकुराकडे अंगुलि-निर्देश केला पाहिजे. रे. टिळक यांनी या पुरवणीत लिहिले आहे ते असे : "रे. बाबा पद्मनजी म्हणजे मराठी खिस्ती सारस्वताचे जनक होत. ...... त्यांचा 'अरुणोदय,' "अनुभवसंग्रह," "ज्ञाननीतिबोध-संग्रह" व हिंदु धर्माचे स्वरूप" ह्या ग्रंथाचे मनापासून परिशीलन करणारा मनुष्य खिस्ताचा झाल्यावाचून राहणार नाही मग तो बाप्तिस्मा घेवो किंवा जनभीतीस्तव गुप्तपणे खिस्तभक्त राहो."

—रे. टिळकांचे हे निवेदन पुष्कळदा त्यांच्या स्वभावाशी विसंगत वाटण्याइतके स्पष्ट व साहसी आहे हे सहज जाणवते. परंतु हा विचार येथे महत्वाचा नाही. महत्वाचा विचार असा आहे की, रे. टिळकांसारखे एक किंवा अनेक वाचक 'अरुणोदया' चे असू शकतील काय ? हा ग्रंथ वाचून कृतीला उद्युक्त होणारा वाचक संभवतो काय ? आणि या प्रकारच्या कृतिप्रवण भूमिकेने या वा इतर कोणत्याही ग्रंथाचे वाचन करणे योग्य आहे काय ? जो वाचक 'अरुणोदय' वाचून कोणत्याही प्रच्छन्न वा प्रकट बाप्तिस्म्यासाठी सिद्ध होत नाही. त्या वाचकाने या ग्रंथापासून काय मिळविले वा काय मिळवायला हवे ? 'अरुणोदया' चे वाचन अशा वाचकापुरते व्यर्थ समजावयाचे काय ? खिस्ती वाङ्मय म्हणजे खिस्ती करण्यासाठी लिहिलेले वाङ्मय काय ? ज्या धर्माला समाजातील जातिभेद अमान्य आहेत. त्या धर्माला वाङ्मयातील जातिभेद मान्य आहेत असे समजायचे काय ? वाङ्मयात खरोखरच जातिभेद संभवतात काय ?

रे. टिळकांच्या निवेदनामुळे हे सर्व प्रश्नोपप्रश्न निर्माण होतात. या प्रश्नोपप्रश्नांची उत्तरे मला द्यावयाची नाहीत. आजच्या वाचकांनी स्वतःच त्या प्रश्नांची उत्तरे शोधून काढावीत. प्रस्तुत मुद्दा एवढाच की, 'अरुणोदया'च्या वाचकांना स्वतः लेखकाने एका बाजूने कोंडीत पकडले व दुसऱ्या बाजूने एका खिस्ती वाचकाने चेपून काढले. या ठिकाणी मी माझा स्वानुभव कथन केला तर तो उपयुक्त ठरावा : 'अरुणोदय' हे आत्मवृत्त वाचून मला खरोखरच प्रकटपणे वा प्रच्छन्नपणे बाप्तिस्मा घ्यावा असे वाटले नाही. एवढेच नव्हे तर, या ग्रंथातील धर्मांतराच्या वैचारिक प्रक्रियेपैकी एकाही प्रक्रियेने मी अस्वस्थही झालो नाही. 'अरुणोदय' हे खिस्ती वाङ्मय आहे व म्हणून त्याच्या वाटेस जाऊ नये असेही अर्थात मला वाटले नाही. [ नाही तर त्या ग्रंथाचे वाचन व तदनंतरचे हे लेखन मी केलेच नसते ! ] एका प्रामाणिक व्यक्तीचे पारमार्थिक स्थित्यंतराचे स्वानुभव म्हणूनच हे पुस्तक मला वाचावेसे वाटले. या स्वानुभवांची कोणतीही विशेषणे वा क्रियाविशेषणे मला अभिप्रेत नव्हती. [ हा ग्रंथ अध्यापनासाठी नियुक्त केला आहे म्हणून ही व्यावहारिक हेतूसाठी मी वाचला नाही. ]

'अरुणोदया'चे 'मनापासून परिशीलन' करताना माझी भूमिका या प्रकारची होती व तशी ती असंख्य वाचकांची असणे शक्य आहे. परंतु रे. टिळकांसारखे 'धर्मवाचक'ही या ग्रंथाला लाभणे शक्य आहे, नाही असे नाही. पण स्वातंत्र्य देण्याचा उदारपणा माझ्यासारखा फक्त वाचकाची व निखळ वाचकाचीच भूमिका घेणारा मनुष्य दाखवू शकतो. स्वतः रे. बाबा पद्मनजी व रे. टिळक या दोघाही रेव्हरंडांनी मात्र हे स्वातंत्र्य

वाचकाला देण्याचे जणू नाकारलेच आहे, असे दिसते. या धुरीणांच्या मागे ग्रंथाच्या आकलनासाठी मदत मागावयास जावी तो ही परवड माझ्यासारख्या वाचकांची होते.

वास्तविक गोष्ट अशी आहे की, एखाद्या चांगल्या किंवा वाईटही, ग्रंथाची उपयुक्तता अनेकविध वाचकांना अनेकविध प्रकारची असू शकते. तुकारामाने अभंग लिहिले ते विठ्ठलवादी भागवतांसाठी ! परंतु विठ्ठलवादी नसलेल्या व भागवतधर्मीयही नसलेल्या प्रार्थनासमाजाच्या व मूर्तिपूजक नसलेल्या खिश्चन समाजाच्या लोकांना त्यांचे अभंग उपयुक्त वाटलेच. तुकोबा हे मोठे होते हे खरेच, बाबा पद्मनजी तितके मोठे अर्थातच नाहीत. म्हणून त्यांचे 'अरुणोदया'तील विचार खिस्तेतर लोकांना कदाचित उपयुक्त वाटणारही नाहीत. पण याही विवेचनाचा 'अरुणोदय' समजावून घेताना काही उपयोग नाही, हे लक्षात ठेवले पाहिजे. ग्रंथाचे आकलन व मूल्यमापन त्याच्या उपयुक्ततेवरून करावयाचे नसते हे महत्त्वाचे आहे.

रे. टिळकांना 'अरुणोदया' ची धार्मिक परिवर्तनाच्या दृष्टीने उपयुक्तता वाटते. माझ्या दृष्टीने या प्रकारची उपयुक्तता या ग्रंथात मुळीच नाही; नव्हती. मूळ प्रश्न असा की, एखाद्या माणसाच्या धर्मांतरकहाणीवरून खरोखरच समाजात धर्मांतर घडवून आणणे शक्य आहे काय ? रे. टिळकांनी 'अरुणोदया' ला त्यांच्या नकळत भगवद्गीता, बायबल व कुराण यांच्या उच्च पातळीवर नेऊन ठेवले आहे. बायबलसारखा श्रेष्ठ व उज्ज्वल धार्मिक परंपरा व प्रभाव असलेला ग्रंथ वाचूनही, धर्मांतराच्या किती भयंकर 'वेणा' बाबा पद्मनजींना सहन कराव्या लागल्या हे त्यांच्या आत्मकथेवरूनच सहज लक्षात येते. मग 'अरुणोदय' वाचून बाप्तिस्म्याला प्रवृत्त होणारा माणूस, 'The operation is successful but the patient is dead' या उक्तीप्रमाणे खासच निकालात निघायचा ! [बिचाऱ्या पापी माणसाला असे मरताना केवळ नामस्मरणाने 'पतितपावन' होण्याची मुभा वापुड्या हिंदुधर्मात तरी आहे, खिस्ती धर्मात ही मुभा नाही म्हणून मरताना धर्मांतराची प्रवृत्ति त्याचे 'तारण' कशी करणार ? ]

## निर्भेळ वाङ्मयीन दृष्टीतून

### आत्मचरित्रात्मक 'अरुणोदय'

उपयुक्ततावादी वाङ्मयीन दृष्टीकोन हा भ्रामक असतो. एवढेच या ठिकाणी महत्त्वाचे म्हणून लक्षात ठेवले पाहिजे. वाङ्मयाने धर्मक्रांति काय वा समाजक्रांति काय, कोणत्याच क्रांति वगैरे होत नाहीत. रे. टिळकांच्याप्रमाणे 'अरुणोदया'कडे क्रांतिवादी व म्हणून उपयुक्ततावादी दृष्टीने पाहणारा वाचक आज कालच्युत ठरलेला आहे. आज धर्ममूल्यच मलिन, शबल व निस्त्राण झाले आहे. मग ते खिश्चन धर्ममूल्य असो वा हिंदु धर्ममूल्य असो ! 'अरुणोदया'च्या कालच्या वाचकाच्या दृष्टीने त्याची धार्मिक उपयुक्तता व इष्टता भ्रांतिष्ट होती व आजच्या वाचकाच्या दृष्टीने ती धार्मिक इष्टता व उपयुक्तता अस्तित्वातच नाही. मात्र 'अरुणोदय' काल अस्तित्वात होते, आजही आहे (– उद्या राहील की नाही हे सांगणे कठीण पण सुचविणे शक्य आहे. माझे हे लेखन त्या सुचविण्याचाच एक वेगळा प्रकार!) याचे कारण असे की, या ग्रंथाला काही एक वाङ्मयीन उपयुक्तता आहे. ती चांगली की वाईट, श्रेष्ठ की कनिष्ठ हा प्रश्न खरे म्हणजे अप्रस्तुतच आहे. वाचकाची खरी समस्या या वाङ्मयीन उपयुक्ततेशीच निगडित झालेली असते. 'उपयुक्तता' हा शब्द या ठिकाणी मी ओघात आला म्हणून व काहीशा अनवधानाने वापरला आहे. मला जे म्हणावयाचे आहे ते असे की, अरुणोदयाकडे वाङ्मयीन दृष्टीने कसे पाहता येईल हे लक्षात घेणेच वाचकांच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे आहे,

'अरुणोदय' हे खंडित आत्मचरित्र आहे. कारण यात आत्मचरित्रकाराने आपल्या जन्मापासून धर्मांतरापर्यंतचे जीवन चित्रित करण्याचा प्रयत्न केला आहे. अधिक काटेकोरपणाने बोलावयाचे तर हे आत्मचरित्र धर्मांतराच्या लक्ष्याने conditioned केलेले आहे एका दृष्टीने लेखकाने आपल्या धर्मांतरापर्यंतच्या जीवनातील अनेकविध व असंख्य स्वानुभवांची साभिप्राय व सार्थ निवड केलेली आहे. ही निवड आपल्या वयाच्या अठ्ठावन्नाव्या वर्षी व धर्मांतराच्या घटनेनंतर जवळजवळ पंचवीस वर्षांनी केलेली आहे. ही निवड करीत असताना, "मजविषयी








आजपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडून आल्या, त्याविषयी जर आरंभापासून विचार केला, तर त्या सर्वांत देवाचा हात आहे व ती देवाची करणी होती, असे आपणास दिसून येईल..." या प्रकारच्या ईश्वरी नियोजन-कल्पनेची [ Divine dispension ] श्रद्धावृत्तीही लेखकाने धारण केली होती असे दिसते. एका दृष्टीने आपल्या चोवीस वर्षांच्या आयुष्यक्रमात ज्या गोष्टी आपाततः घडत गेल्या, त्या गोष्टींची ईश्वरी नियोजन-कल्पनेच्या द्वारा पुनर्रचना करून लेखकाने 'अरुणोदय' वाचकापुढे ठेविला आहे. या पुनर्रचनेची बैठक स्पष्ट करताना लेखकाने म्हटले आहे : " ... ह्या गोष्टी ह्या पुस्तकात सिद्धांतरूपाने स्थापिल्या नाहीत, किंवा सूत्ररूपाने ग्रथिल्या नाहीत तर इतिहासरूपाने म्हणजे खरोखर घडलेले वृत्त कथन करून दर्शविल्या आहेत" – याचा अर्थ असा की स्वानुभवांची पुनर्घटना करताना, त्यांच्या वास्तवरूपांना विकृत करण्याचे लेखकाने टाळले आहे. त्या घटना शक्यतो 'यथाक्रम व यथारूप' मांडण्याचा लेखकाने कटाक्षाने प्रयत्न केला आहे. **पण हे फारसे खरे नाही व खोटे आहे म्हणूनच दोषास्पद आहे असेही नाही.** लेखकाने आपले पूर्वजीवन स्मरणोज्जीवित पद्धतीने पुन्हा उभारले आहे. या पुनर्रचनेत निवड अपरिहार्यही आहे. व ती धर्मान्तराच्या कळसाच्या लक्ष्याने केलेली आहे यात चूक नाही. चूक आहे ती लेखकाच्या सत्याविषयीच्या भयगंडात! आपण जे लिहित आहोत, ते सत्यच असावे असे त्याच्या पापभीरू व सत्यनिष्ठ मनाला सारखे जाणवत आहे. सत्याची अभिज्ञता व आचार हा श्रेष्ठ सद्गुण असला तरी वाङ्मयातील सद्गुण वेगळेच असतात. वाङ्मयात सद्गुणाचे प्रमाणपत्र केवळ सत्याच्या प्रामाणिकपणाच्या, ऋजुतेच्या, कळवळीच्या आधारावर मिळत नाही. रे. बाबांना हे प्रमाणपत्र हवे आहे की काय ते कळत नाही! या लेखकाने आपल्या चोवीस वर्षातील जीवनाचे सर्व स्वानुभव यथाक्रम व यथारूप सांगितलेले नाहीत, हे अधिक मोठे सत्य आहे. खिस्ती धर्मातील नवा आचारविचार पंचवीस वर्षांच्या प्रदीर्घ काळात हाडीमासी घट्ट खिळल्यानंतर हे पूर्वचरित्र रे. बाबानी लिहिले आहे. चोवीसाव्या वर्षीच त्यानी हे पूर्वचरित्र लिहिले असते, तर या पूर्वचरित्राचा घाट व थाट कदाचित् निराळाच झाला असता. वयाच्या सत्तराव्या वर्षी जर त्यानी 'अरुणोदय' लिहिला असता तर तोही कदाचित् असाच वेगळा ठरला असता.

--मी असे म्हणतो त्याला कारण आहे. तुकारामाने आपले आत्मचरित्र अत्यंत थोडक्यात एकदा अगदी मनाविरुद्ध आपल्या संतमंडळींना निवेदन केले. तुकारामाचे हे आत्मचरित्र त्याने कोणत्याही वर्षी लिहिले असत वा कथन केले असते तरी त्याचा आशय व अभिव्यक्ति बदलली नसती. रे. बाबांच्या बाबतीत हे शक्य नाही व नव्हते. या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण एवढेच की, रे. बाबांच्या आत्मनिवेदनामागे एक प्रकट पारमार्थिक प्रयोजन आहे. तुकारामाचा केवळ आत्माविष्कार आहे व तो प्रयोजनशून्य आहे. पारमार्थिक प्रयोजनाचे उद्घाटन व उपपादन स्वग्रंथातून करीत असताना वय व वयाबरोबर कमी अधिक होणारा पारमार्थिक अनुभव उपयुक्त असतो व त्याचा उपयोग करणे लेखकाला टाळता येत नाही. या अनुभवांच्या आधारे आत्मचरित्रातील असंख्य अनुभवांची पुनर्रचना करता येते. त्याना conditioned करता येते. रे. बाबा पदमनजींनी हेच केले असते. कारण ते करणे अनिवार्य होते.

## सदोष, सव्यंग अनुभव चित्र

याच ठिकाणी वाचकाची महत्त्वाची अडचण निर्माण झाली आहे : 'अरुणोदय' हे कसेही असले तरी आत्मचरित्रच आहे व म्हणून वाङ्मय आहे व वाङ्मयात स्वानुभव वा स्वेतरांचे अनुभव conditioned करावे लागतात हेही खरे आहे व ते वाचकाला समजूही शकते. प्रश्न असा व इतकाच आहे की, ही सीमा घालण्याची प्रक्रिया वाचकाला स्वयंपूर्ण, परिपूर्ण, वाटत नाही. दादोबा पांडुरंगांनीही आत्मचरित्र लिहिले आहे. पण हे आत्मचरित्र खऱ्या अर्थाने अनुभवाचे संकीर्ण व साकल्यात्मक चित्रण आहे. ते खरोखरच यथाक्रम व यथारूप आहे. ते कोणत्याही प्रयोजनाने वा श्रद्धेने conditioned केलेले नाही. [ म्हणून ते फारसे मौलिकही नाही हेही खरेच! ] वाङ्मयात अनुभवांना वा स्वानुभवांना



अनुक्रमणिका






सीमारेषा घालत असताना ती पुराणातल्या लक्ष्मण-रेषेसारखी अभेद्य असावी लागते. ती सीमारेषा वयाबरोबर व अनुभव व्यासंगादि गोष्टींबरोबर कमी-अधिक वक्र होणारी अशी लेचीपेची नसावी. ‘ अरुणोदया ’तील conditioning ची प्रक्रिया ही पर्यायक्षम वाटते. मला वाटते की, या लेखकाने आपल्या कौटुंबिक संस्कारांचा, हिंदु धर्मकल्पनांचा, ख्रिस्ती धर्मकल्पनांचा आपल्या परिसरातील लोकांचा, आपल्या कालखंडाचा, आपल्या परंपरेचा अधिक विचार केला असता किंवा केला आहे त्यापेक्षा कमी विचार केला असता, तर त्याच्या आत्मचरित्राचे स्वरूप व निवेदन वेगळे झाले असते. म्हणजे या लेखकाने जे धर्मांतर केले आहे, ते केलेच नसते असा मात्र याचा अर्थ नाही. धर्मांतर ज्यांनी ज्यांनी केले त्यांनी काय रे. बाबासारखा पूर्वविचार थोडाच केला असणार ? विचार सर्वांनाच पेलत नाहीत. परंतु या ठिकाणी धर्मांतराच्या घटनेचे महत्त्व नाही. या घटनेची परिहार्यता वा अपरिहार्यताही येथे महत्त्वाची नाही. आपण आत्मचरित्रातील स्वानुभवांच्या पुनर्रचनेचा विचार करीत आहोत. या पुनर्रचनेत परिवर्तन संभवते असे वाचकाला वाटत राहाते. ही इमारत वाचकाला वेगळ्या पद्धतीने रचता आली असती, असे वाटते. असे वाटते की, या आत्मवृत्तात जे जे अनुभव लेखकाने मांडले आहेत, त्यांना पर्याय संभवतात. चांगल्या आत्मचरित्रात व म्हणून चांगल्या ललित वाङ्मयात अशी पर्यायक्षमता नसते, नसावी. ललित वाङ्मयातील अनुभवचित्र हे अनन्यसाधारण व एकमेवाद्वितीय वाटले पाहिजे. त्याच्या स्वरूपाविषयी बिनतोड खात्री पटली पाहिजे. आहे त्या रूपात व घाटातच ते यथार्थ व प्रभावी वाटले पाहिजे. वाचकाला त्या अनुभवचित्रात ढवळाढवळ करता येऊ नये अशी त्याची पक्की रचना हवी. ते अनुभवचित्र वाचकाला स्वतःशी खिळवून ठेवण्यास समर्थ असले पाहिजे. ते वाचत असता सविकल्प का होईना, पण वाचकाची समाधि लागली पाहिजे. वाचकाच्या मनात विकल्प निर्माण होऊ लागले, त्याचे लक्ष अनुभवचित्रावरून उडू लागले व वेगळेच अनुभवचित्र मनात उभारू लागले; त्या अनुभवचित्रावर स्वतःच्या विचारांचे कुंचले फिरवू लागले, त्याचे विडंबन वा विकृति करावयास प्रवृत्त झाले नि त्या अनुभवचित्राला दुसरा घाट, दुसरा बांधा देता येईल अशी खात्री जर वाचकाला पटू लागली, तर त्या अनुभवचित्रात काहीतरी दोष आहे, व्यंग आहे ते फसलेले चित्र आहे, असे समजावयास हरकत नाही.

रे. बाबा पदमनजींच्या ‘ अरुणोदया ’ च्या बाबतीत या सर्व गोष्टी करावयास वाचक प्रवृत्त होतो. आणि या वाचकाचा कोणत्याही धर्माशी असे करताना संबंध नसतो. असे होण्याचे कारण काय ?

मी वर नमूद केले आहे की, आत्मचरित्रकाराचे ‘ अरुणोदय ’ या ग्रंथातील अनुभवचित्र हे धर्मांतराच्या लक्ष्याने पुनर्घटित केले आहे. म्हणजेही असे की, धर्मान्तराच्या घटनेमागे जी एक विचारप्रणाली लेखकाला जाणवली किंबहुना ज्या विचार-प्रक्रीयेतून धर्मांतराची घटना लेखकाच्या बाबतीत अपरिहार्यपणे निर्माण झाली, त्या विचारप्रक्रीयेच्या प्रभावाने लेखकाचे आत्मवृत्त प्रभावित झाले आहे. ही विचार-प्रक्रियाच वाचकाला निर्णायक, अभेद्य एकमेवाद्वितीय व अपर्यायक्षम वाटत नाही. आणि यातच ‘ अरुणोदया ’ च्या अपयशाचे मर्म साठविले आहे, असे मला वाटते. या मर्माचे अधिक स्पष्टीकरण केले पाहिजे.

धर्मांतर ही घटना वा अनुभव सामान्य नव्हे. व्यक्तीच्या जीवनातील ती अतिशय क्रांतिकारक, अतिशय प्रक्षोभक, अतिशय विशाल व विराट अशी ती घटना आहे. धर्मांतराचा अनुभव हा या दृष्टीने लोकविलक्षण व म्हणूनच अनन्यसाधारण आहे. विलक्षण unique असा हा अनुभव आहे. सामान्य लोकांच्या दृष्टीने, समाजाच्या दृष्टीने हा अनुभव वेगळा व वैशिष्ट्यपूर्ण आहे. असा आगळा अनुभव जेव्हा आत्मचरित्राचा विषय होतो, म्हणजे ललित साहित्याचा विषय होतो, तेव्हा त्यातील अंगभूत गुण-विशेषांनी ते आत्मचरित्रात्मक साहित्य कितीतरी प्रभावी व अनन्यसाधारण ठरण्याची शक्यता असते. एकाच धर्मात राहूनही सामान्यत्वापासून संतत्वापर्यंत पारमार्थिक प्रवास करणाऱ्या व्यक्तीचा अनुभव श्रेष्ठ व चिरंतन वाङ्मय निर्माण करू शकतो, हे मराठी वाचकांना तरी मुद्दाम सांगण्यासारखे नाही. या अनुभवापेक्षाही







धर्मांतराचा अनुभव हा अधिक संमिश्र, अनेकपदरी, नि चित्रविचित्र असतो नि म्हणूनच त्याच्या अधिष्ठानावर उभी राहणारी साहित्यकृति उत्तुंग होण्याची दाट शक्यता असते.

'अरुणोदया'ला या प्रकारच्या धर्मांतराच्या अनुभवाचे वैशिष्ट्यपूर्ण अधिष्ठान लाभूनही ही साहित्यकृति फार ठेंगू ठरली आहे, असे वाचकाला विषादपूर्वक जाणवत असते. एका श्रेष्ठ अनुभूतीचा करंटा आविष्कार 'अरुणोदया'त आढळल्यावर वाचकाचे मन निराश होते. ललित साहित्यकृतीचा एक महत्तम विषय या ठिकाणी पराभूत झाल्याची प्रखर जाणीव वाचकाला होते. आत्मचरित्रकाराला हा महान अनुभव पेलला नाही याची वाचकाला खात्री पटते.

## अपुरी बौद्धिक प्रक्रिया

याचे कारण शोधताना अनेक गोष्टी आपल्या लक्षात येतील. आपल्या धार्मिक भूमिकेच्या स्थित्यंतराचा आलेख या लेखकाने एका सर्वसामान्य व सरपटत जाणाऱ्या बौद्धिक प्रक्रियेने रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. धर्मांतराच्या अनन्यसाधारण अनुभवाचा साक्षात्कार घडविण्यास ही बौद्धिक प्रक्रिया फार थोटकी, अपुरी पडली आहे, असे आपणास सतत जाणवते. एखाद्या चिंधीने आकाशाला गवसणी घालण्याचा किंवा घालण्यासारखा हा प्रयत्न वाटतो. पायदळी चाललेली ही बौद्धिक चतुर विचारप्रणालि धर्मांतराचा अवघड दुर्ग कसा चढून गेली याचेच पुष्कळदा आपणास आश्चर्य वाटते. रे. बाबांचा कुळाचार, त्यातील त्याना न आवडणाऱ्या व पटणाऱ्या गोष्टी, त्यांचा प्राकृत ग्रंथांचा अभ्यास, खिस्ती वाङ्मयाचा व व्यक्तींचा परिचय, त्यांचे चिंतन व मनन या सर्व गोष्टी नीटपणे समजावून घेतल्या तरी, यातूनच धर्मांतराचा कलशीभूत अनुभव कसा व का निर्माण होतो, हेच आपणास कळेनासे होते. हिंदु धर्मातील नवसादि गोष्टींनी रोग बरे होत नाहीत हे रे. बाबांचे मत समजू शकते, परंतु पुण्यात पसरलेली इन्फ्लुएंझाची साथ खिस्ती प्रार्थनांनी कशी आटोक्यात येईल हा विचार रे. बाबांना कसा शिवत नाही याचे वाचकाला नवल वाटते. रे. बाबा धर्मांतर करतात पण त्यानंतरही त्यांचे हिंदु आईवडील त्यांच्याशी फार चांगले वर्तन करतात. याचे श्रेय रे. बाबांनी हिंदु धर्मातील सहिष्णुतेच्या संस्काराना न देता, खिस्ती ईश्वराच्या कृपेलाच का द्यावे हेही आपणास समजू शकत नाही. हिंदु धर्मात व्यक्तीच्या नीतिमत्तेचा विकास होण्याची संधि व साधने नाहीत असे रे. बाबांना वाटते. कदाचित् हे थोडा वेळ खरे मानले, तरी खिस्ती धर्मीयात आजवर व आताही नीतिविषयक समस्या निर्माणच झाल्या नाहीत असे रे. बाबांना का व कसे वाटावे ते आपणास उमगत नाही. शकुन, मुहूर्त, तंत्रवाद ही खिस्ती जगात नाहीत व नव्हती हे रे. बाबा का समजतात तेही आपणास कळत नाही.

— या ठिकाणी वर दिलेल्या उदाहरणांचे भांडवल मला करावयाचे नाही. मुख्य विचार असा आहे की, धर्मांतरावर आरूढ होणारी आत्मचरित्रकाराची बौद्धिक प्रक्रिया ही अतिशय एकांगी आहे व अत्यंत कनिष्ठ पातळीवरची आहे. मराठी साधुसंतांचे पारमार्थिक प्रवासाचे अनुभव या ठिकाणी लक्षात घेतले तर रे. बाबांची सगळी बौद्धिक विचारप्रणाली ही अत्यंत साधारण स्तरावरची आहे, हे लक्षात यावयास अडचण पडणार नाही ही बौद्धिक प्रणालि अगदी Pedestrian आहे. ती एका बाजूने अशी मामुली स्वरूपाची आहे व दुसऱ्या बाजूने अर्धवट, अर्धज्ञानावर उभारलेलीही आहे.

## फसलेली साहित्यकृति

मला या स्थळी या विचारसरणीवरही आक्षेप घ्यावयाचा नाही. या विचारसरणीने धर्मांतराच्या अनुभवाचा संपूर्ण कबजा घ्यावयास नको होता असे मला वाटते. धर्मांतर हा मौलिक जीवनानुभव आहे. या मौलिकतेचे रूप करताना या रूक्ष नि सरपटत जाणाऱ्या बौद्धिक विवेकाने एक प्रकारचा आगाऊपणा करून स्वतःला न झेपणारे काम विनाकारण स्वीकारले याचाच आपणास खेद वाटतो. अगदी ललित वाङ्मयाच्या प्रकृतीच्या दृष्टीने पाहिले, तरी केवळ बौद्धिक प्रक्रिया ही अनुभवाच्या यथार्थ दर्शनाला पुरेशी पडत नाही, हे आपल्या सहज लक्षात येईल. आपल्या कादंबऱ्यात प्रज्ञाविलास करणारे वामन मल्हार व डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांची व प्रज्ञाविलासाची काय












दुर्दशा झाली हे आपणास परिचित आहेच. म्हणूनच धर्मांतर करणाऱ्या व्यक्तीचे खळबळणारे मानसचित्र केवळ बौद्धिक प्रक्रियांनी नीटपणे रेखाटले जाणार नाही. रे. बाबांनी आपल्या स्वानुभवांचे बौद्धिक चित्र 'अरुणोदया'त काढण्याचा प्रयत्न केला आहे. बौद्धिक चित्राला पर्याय संभवतात. त्या बौद्धिक चित्रापेक्षा कमी वा अधिक योग्यतेचे बौद्धिक चित्र इतरांना वा काहींना काढता येणे अगदी शक्य असते. एवढेच नव्हे तर, एकाच व्यक्तीला वाढत्या वयाबरोबर व वाढत्या अनुभवांबरोबर एकदा काढलेले चित्र पुनःपुनः बदलता येते, वाढविता किंवा कमी करता येते व ही ऱ्हास-वृद्धि गुणसंख्यात्मक अशी दुहेरी स्वरूपाची असू शकते. म्हणूनच वाङ्मयातील बौद्धिकचित्र हे फसते. ते पर्यायक्षम ठरते. त्याचा आशय नि अभिव्यक्ति परिवर्तनीय असतात. ललित साहित्यातील बौद्धिकता ही प्रत्यक्ष अनुभवांच्या अंगभूत, आनुषंगिक व म्हणून एक घटकावयवी या प्रकारची असते. ती संपूर्ण अनुभवचित्राचा एक भाग असते. व त्या संपूर्ण अनुभवचित्राने प्रेरित नि प्रभावित झालेली असते. म्हणून तिला पर्याय संभवले तरी संपर्ण अनुभवचित्राला पर्याय संभवत नाही. ते अनुभवचित्र ( unique ) राहते. आणि त्याचा हा गुणविशेष अबाधितही राहतो. 'अरुणोदया'तील बौद्धिक घटक हा भाग न राहता 'संपूर्णत्वच' बनला आहे. एवढेच नव्हे तर या बौद्धिकाने 'अरुणोदया'तील संपूर्ण अनुभवचित्र प्रेरित व प्रभावित केले आहे. म्हणूनच हे आत्मचरित्र ललित साहित्यकृति या दृष्टीने संपूर्णपणे फसलेले आहे. वाचकाला ते ललितसाहित्यकृति म्हणून स्वीकारणे व वाचणे म्हणूनच अवघड वाटते.

'अरुणोदया'तील अनुभवचित्र आणखी एका दृष्टीने फसलेले आहे : ते अशा अर्थाने, की धर्मभावना वा धर्मस्वीकार ही अखेरपक्षी मानवी श्रद्धेची गोष्ट आहे, हे या आत्मचरित्रकाराच्या कधीही लक्षात आलेले नाही. विशेषतः धर्मक्षेत्रातच जीवन व्यतीत करणाऱ्या रे. बाबांच्या ध्यानी ही गोष्ट वयाच्या अठ्ठावन्नाव्या वर्षीही येऊ नये याचे वैषम्य व विस्मय वाटल्यावाचून राहात नाहीत. धर्मांतर करावयाला हरकत नाही. परंतु धर्माचा स्वीकार किंवा परित्याग ज्या श्रेष्ठतम भावनेच्या पोटी करावयाचा, त्या श्रेष्ठतम भावनेचा जरासाही स्पर्श 'अरुणोदया'ला झालेला नाही. हिंदु माणूस असो वा खिस्ती माणूस असो, परंतु अशा माणसाची विवाहित पत्नी एका विशिष्ट लवचिक व असाहाय्य स्थितीत त्याकडे पत्नीभावाने आधार याचित असते, हा प्रसंग केवढा नाट्यपूर्ण आहे ! श्रेष्ठ धर्मश्रद्धाही विचलित करून विभ्रांत करणारा हा अपूर्व व अघटित प्रसंग ! विशेषतः रे. बाबांसारख्या अंतर्मुख ( ? ) वृत्तीच्या व्यक्तीला हा प्रसंग किती प्रकर्षाने जाणवावा ! परंतु या प्रसंगातील सगळे भावनासमर एका पाषाणी धर्मवृत्तीने व स्थितप्रज्ञतेने या रे. बाबांनी जिरवून टाकले आहे !

— मला या ठिकाणी रे. बाबांच्या पहिल्या हिंदू धर्मपत्नीची बाजू घ्यावयाची नाही, अगर रे. बाबा खिस्ती धर्ममूल्यांनी मानवतेला पारखे झाले होते असेही सुचवायचे नाही. मला 'अरुणोदया'तील भावनेच्या अभावाचे स्वरूप उघड करावयाचे आहे. मी वर म्हटल्याप्रमाणे धर्म ही भावनेची वा श्रद्धेची मिरास होय. या श्रद्धेने वा भावनेने 'अरुणोदया'तील अनुभवचित्र प्रभावित झालेले नाही. हिंदु धर्माबद्दल तर सोडाच, परंतु खिस्ती धर्माविषयीही भावनाप्रेरित व भावनामय झालेला अनुभव या ग्रंथात आढळत नाही. ललित साहित्यकृतीतील नास्तिकाचा अनुभवही जर भावनोत्कट असेल तर तो आस्तिक वाचकाला स्वीकार्य व आस्वाद्य वाटतो. 'अरुणोदया'त हिंदु वा खिस्ती माणसाला वाचक म्हणून आस्वाद्य वाटणारा एकही भावनोत्कट अनुभव नाही.

## वाचण्याचे कारण नाही असे आत्मवृत्त

आणखी असे की, रे. बाबांनी धर्माची भावनात्मक बाजू जर यथार्थपणे समजावून घेतली असती तर, आपल्या अनुभवचित्राला त्यांनी सरधोपट पर्यायक्षम बौद्धिकतेची बैठकही दिली नसती. सत्य सांगण्याच्या ईर्षेने रे. बाबांनी आपले विचार आत्मवृत्ताद्वारे वाचकांना प्रत्यक्षपणे, प्रकटपणे पटविण्याचा प्रयत्न केला. आपल्या धर्मांतराचे अनुभवदर्शन घडविण्याऐवजी त्याचे समर्थन करण्याचा प्रयत्न केला. जे धर्मांतर आपण स्वीकारले ते न्याय्यच होते हे बौद्धिकदृष्ट्या वाचकाच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न केला. या बौद्धिक भूमिकेमुळे त्यांचे अनुभवचित्र धड ललित

साहित्यही नाही व धड वैचारिक प्रबंधही नाही या प्रकारचे त्रिशंकुवत् बनले. ललित साहित्यही बोध करू शकते. एखाद्या घटनेची वा अनुभवाची न्याय्यता व अपरिहार्यता वाचकाला पटवू शकते. परंतु ती बोधप्रक्रिया वेगळ्या प्रकारची असते. ती अधिक भावनात्मक व कमी बौद्धिक असते. हे सगळे लक्षात घेऊन मग 'अरुणोदय' हा ग्रंथ वाचावा किंवा नाही याचीच शंका वाचकांना भेडसावू लागते. व ही शंका अगदी रास्त असते.

आपल्या धर्माविषयक आंतरिक स्थित्यंतराकडे खऱ्याखुऱ्या धर्मवृत्तीने (म्हणजे धर्म ही श्रद्धेची गोष्ट आहे या जाणीवेने) रे. बाबांना पाहता आले नाही हे जसे खरे आहे, तशीच दुसरी एक गोष्ट त्यामुळे खरी ठरली आहे. ती अशी की, रे. बाबांच्या धर्मविषयक आंतर आंदोलनातून त्यांना एखादी vision ही देखील प्राप्त झाली नाही. एखादा दिव्य क्षण, एखादी लकाकून गेलेली स्वर्गीय अनुभूति, एखादी तरळून गेलेली भव्य भावना, एका क्षणी सर्वस्वाचे सोने करणारी एखादी प्रतिमा, स्वतःच्या नि स्वेतरांच्या अस्तित्वाचा अर्थ प्रकाशित करणारा एखादा साक्षात्कार यापैकी काही काही या धर्मांतराच्या कहाणीत नाही, याचे फार वाईटही वाटते. ईश्वरदत्त धर्माचा परित्याग करावयाला केवळ बुद्धि पुरी पडत नाही. तर या प्रकारचा काही एक उत्कट 'mystical' अनुभव (realization) हाही त्या परित्यागासाठी इष्ट व आवश्यक असावा असे वाटत राहते. परंतु धर्मांतराचा विराट अनुभव चित्रित करणारा हा आत्मचरित्रकार अखेरपर्यंत (म्हणजे प्रत्यक्ष धर्मांतरापर्यंत!) कनिष्ठ बुद्धीच्या पातळीवरच भिरभिरत राहिला!

माझ्यासारख्या 'अरुणोदया' च्या वाचकाचा अखेरचा पराभव 'mystical' अनुभवाचा हा अभाव करतो. असे मला वाटते. मला या ठिकाणी कुठल्याही धर्माची आपपरभावना महत्त्वाची वाटत नाही. वाटते ते असे की, धर्मांतर करण्याला काहीतरी आंतरिक प्रेरणांचा साक्षात्कार – जो साक्षात्कार मला बुद्धिद्वारा आकलन करता येणार नाही असा – या आत्मचरित्रकाराला झाला असेल! पण साक्षात्काराचा सूर्य या 'अरुणोदया' च्या रथात नाही हे पाहून फार वैषम्य वाटते. या प्रकारच्या साक्षात्कारी अनुभवांनीच धर्मांतराचे हे अनुभवचित्र परिपूर्ण, अभेद्य झाले असते. व म्हणून एक अपूर्व साहित्यकृति ठरले असते. रे. बाबा अखेरपर्यंत बुद्धिवादाच्या शुष्क, पांगळ्या अरुणाचा संग तोडू शकले नाहीत. म्हणूनच वाचकाच्या दृष्टीने त्यांचे आत्मवृत्त वाचनविषयच ठरत नाही असे मला वाटते. एक शंभर टक्के आंतरिक अनुभव एका शंभर टक्के बहिर्मुख वृत्तीने लिहिला गेला, एवढाच 'अरुणोदया' चा खरा अर्थ!

— हा कालमहिमा समजावयाचा काय?

---

## चुकीची दुरुस्ती —

जानेवारी १९६४ चे अंकात 'ग्रीक रंगभूमीचे स्वरूप' ह्या माझ्या लेखात पृष्ठ ४५ वर कॉलम २, पहिल्या परिच्छेदाचे शेवटी "त्या काळात मात्र पडद्याचा वापर होत असल्याचे कळते." असा मजकूर चुकीने छापला गेला आहे. त्याऐवजी "त्या काळात पार्श्वभागी पडद्याचा वापर करीत किंवा काय हे कळत नाही. रोमन काळात मात्र पडद्याचा वापर होत असल्याचे कळते." असे वाचावे.

– कृ. रा. सावंत

---

ले. रॉबर्ट स्कॅलॅपिनो

# मास्को, पेकिंग आणि आशियातील कम्युनिस्ट पक्ष : २ :

– ४ –

पूर्व आशियातील इतर कोणत्या कम्युनिस्ट पक्षांच्या भूमिका इंडोनेशियन, उत्तर कोरियन व उत्तर व्हिएट-नामी कम्युनिस्ट पक्षांच्या भूमिकांशी जुळल्या आहेत ?

प्रथम जपानी कम्युनिस्टांची भूमिका तपासणे योग्य ठरेल. आशियातील इतर कम्युनिस्ट पक्षांच्या तुलनेने जपानी कम्युनिस्ट पक्ष दुर्बळ आहे. औद्योगीकरणाच्या प्रारंभींच्या संक्रमणावस्थेतच कम्युनिस्टांना यशाची सर्वात अधिक संधी असते व औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या समाजात त्यांचा विशेष प्रभाव पडू शकत नाही, याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे जपान. औद्योगिक दृष्ट्या आज जपान हा एक अत्यंत पुढारलेला देश आहे. आणि सर्वसाधारणतः सार्वत्रिक निवडणुकांमध्ये जपानी कम्युनिस्ट पक्षाला मिळणाऱ्या मतांची सरासरी एकूण मतदारांच्या तीन टक्के इतकी असते. शिवाय गेल्या काही वर्षांत या पक्षात गटबाजीला व अंतर्गत लाथाळयांना ऊत आलेला आहे. पण आज जरी हा पक्ष कमकुवत असला, तरी जपानसारख्या जागतिक सत्तास्पर्धेच्या राजकारणात अत्यंत मोक्याची व महत्त्वाची जागा व्यापणाऱ्या राष्ट्रात तो अजून अस्तित्वात आहे, ही घटना उपेक्षणीय नाही.

जपानी कम्युनिस्टांची भूमिका तटस्थतावादी आहे, पण या पक्षाच्या बहुसंख्य पुढाऱ्यांचा कल आता पेकिंगच्या बाजूला झुकलेला आहे. प्रारंभी या पक्षाने जाहीररीत्या स्पष्ट भूमिका स्वीकारण्याचे टाळले, अथवा अंतर्गत मतभेदांमुळे स्पष्ट भूमिका घेणे त्याला अशक्य ठरले. पक्षाच्या अधिकृत निवेदनात मॉस्को–पेकिंग– तेढीमधील विवाद्य प्रश्नांवर मौन पाळण्यात आले किंवा संदिग्ध भूमिका स्वीकारण्यात आली. सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाच्या अधिवेशनात पक्षाचा सरचिटणीस सान्झो नोसाका हा जपानी कम्युनिस्ट प्रतिनिधी–मंडळाचा पुढारी म्हणून हजर होता. या अधिवेशनात भाषण करताना त्याने स्टॅलिनविरोधी मोहीम व अल्बानिया या दोनही प्रश्नांवर बोलण्याचे सोइस्करपणे टाळले, व जपानला परतल्यानंतर “ जगातील कम्युनिस्ट पक्ष मार्क्स-लेनिन–वादी रक्ताच्या नात्याने एकत्र बांधले गेले आहेत; साम्राज्यवाद्यांच्या कारस्थानांमुळे त्यांची अभेद्य एकजूट नष्ट होणे शक्य नाही ”, अशी त्याने घोषणा केली.

पक्षाच्या “ रेड फ्लॅग ” या मुखपत्रात २९ डिसेंबर १९६१ रोजी संपादकीय लेख प्रसिद्ध करण्यात आला, त्यात क्रुश्चेव्हने अल्बानियावर केलेल्या जाहीर टीकेला अप्रत्यक्षरीत्या व सावधपणे विरोध व्यक्त करण्यात आला. या लेखात १९६० च्या मास्को निवेदनात सुचवलेल्या पद्धतीनुसार निरनिराळया कम्युनिस्ट पक्षांच्या भूमिकांमध्ये सुसूत्रता व सुसंगति साधणे “ शक्य, आवश्यक व उचित ” आहे याकडे लक्ष्य वेधण्यात आले आणि पक्षाच्या सभासदांनी या विवाद्य प्रश्नांवरील सर्व लेख व कागदपत्र अभ्यासावेत असा आदेश देण्यात आला. त्याचप्रमाणे पेकिंगच्याप्रमाणे जपानी पक्षही या प्रश्नांवरील सर्व पक्षांची निवेदने आपल्या मुखपत्रातून प्रसिद्ध करील असेही जाहीर करण्यात आले. या संपादकीय लेखात आरंभापासून अखेरपर्यंत सर्वत्र एकजुटीवर भर देण्यात आला व स्टॅलिनविरोधी मोहिमेचा उल्लेखही कटाक्षाने टाळण्यात आला.

१९६२ च्या जानेवारीत जपानी कम्युनिस्टांच्या एका प्रमुख पुढाऱ्याने खासगी रीतीने पक्षाची भूमिका विशद केली : जपानी पक्षाचे जे प्रतिनिधी-मंडळ सोव्हिएट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनाला हजर होते त्याच्या दृष्टीने अल्बानियाबाबतचा पेचप्रसंग अनपेक्षित होता. अल्बानियन पुढाऱ्यांवर जी जाहीर टीका करण्यात आली त्याबद्दल इतरांना आधी सूचना देण्यात आली नव्हती वा त्यांचा सल्लाही घेण्यात आला नव्हता. जपानी पक्ष या प्रश्नाचा अजूनही बारकाईने अभ्यास करीत आहे, व या प्रश्नावरील सर्व पक्षांच्या– अल्बानियन पक्षाच्याही– निवेदनांना प्रसिद्धी देण्याचे ठरवण्यात आले आहे. युगोस्लाव्हिया आणि अल्बानिया यांना एकाच मापाने मोजता येणार नाही, कारण युगोस्लाव्हिया हे शत्रुराष्ट्र आहे हे सर्व कम्युनिस्ट पक्षांनी मान्य केले आहे. याच्या उलट सुमारे ३० कम्युनिस्ट पक्षांनी अल्बानियाच्या प्रश्नावर काहीही मत व्यक्त केलेले नाही.










व्यक्तिपूजेचा संप्रदाय व त्याबाबतीतील स्टॅलिनचा दोष यावरील टीकेशी जपानी कम्युनिस्ट पक्ष सहमत आहे. आयुष्याच्या सरत्या काळात स्टॅलिनने अनेक चुका केल्या हे मान्य आहे. पण त्याचबरोबर समाजवाद स्थापन करण्यात व फासिझमविरोधी युद्धात त्याने थोर कामगिरी बजावली आहे, हे दुर्लक्षून चालणार नाही. क्रुश्चेव्हने स्टॅलिनवर प्रखर टीका केली याचे कारण त्याला सोव्हिएट पक्ष स्टॅलिनच्या चुकांची पुनरावृत्ति होऊ देणार नाही याबद्दल जनतेची खात्री करून द्यायची होती. अर्थात् अलीकडे काही दिवसात मात्र त्याने स्टॅलिनच्या दोषावर गैरवाजवी भर दिला आहे.

१९६१ च्या मध्यावर जपानी कम्युनिस्टांचा एक छोटा गट पक्षातून बाहेर पडला व त्याने स्टॅलिनविरोधी व पेकिंगविरोधी भूमिका स्वीकारून फुटीर चळवळ सुरू केली. पक्षातील बहुसंख्य पुढारी महत्वाच्या प्रश्नांवर पेकिंगवादी आहेत असा या गटाने वारंवार पक्षनेत्यांवर आरोप केला आहे पक्षाने गल्या काही महिन्यात जे ठराव व निवेदने प्रसिद्ध केली आहेत त्यातील भूमिका वरील आरोपाला भक्कम पुष्टी देणारी अशीच आहे. निःशस्त्रीकरण व शांततामय सहजीवन यांच्यासारख्या सर्वसामान्य प्रश्नांपासून ते भारत व क्युबा यासारख्या विशिष्ट प्रश्नांपर्यंत महत्वाच्या सर्व मुद्यांवर जपानी कम्युनिस्ट पक्षाच्या अलीकडील निवेदनात चीन–धार्जिणी प्रवृत्तीच आढळते.

जपानी कम्युनिस्टातल्यापेक्षा ब्रह्मदेशातील कम्युनिस्ट चळवळीत जास्त अंदाधुंदी आहे. गेली सुमारे १२ वर्षे या चळवळीत जाहीर फूट पडली आहे. यातील दोन मुख्य गट म्हणजे लाल बावटा कम्युनिस्ट व सफेद बावटा कम्युनिस्ट हे. लाल बावटेवाल्याचा गट हा थाकिन् सो ( Thakin Soe ) याच्या नेतृत्वाखालील छोटा गट आहे व तो १९४६ पासून प्रस्थापित सरकारविरुद्ध लढत आहे. या गटावर " टॉट्स्कीवादी " म्हणून चुकीचा शिक्का मारण्यात आला आहे. वस्तुतः हा गट म्हणजे खास ब्रह्मदेशीय कम्युनिस्टांचा गट आहे, व थाकिन सोच्या निर्भेळवादी ( Purist ), सर्जनशील व अहंमन्य प्रवृत्तीतून त्याची सैद्धान्तिक घडण तयार झालेली आहे. सोचा तात्विक कल अर्थातच क्रुश्चेव्हसारख्या व्यक्तीच्या प्रवृत्तीशी जुळणारा नाही. सफेद बावटेवाल्या कम्युनिस्ट पक्षाचे नेतृत्व थान् तुन याच्याकडे आहे. या गटाला ब्रह्मदेशातील कम्युनिस्ट पक्ष म्हणून आंतरराष्ट्रीय मान्यता मिळालेली आहे. याखेरीज नॅशनल युनिटी फ्रंटसारख्या वेगळ्या मार्क्सवादी व कम्युनिस्ट प्रभावाखालील अशा अनेक संघटनाही अस्तित्वात आहेत.

सोव्हिएट पक्षाच्या २२ व्या अधिवेशनानंतर सोच्या लाल बावटेवाल्या गटाने क्रुश्चेव्ह व इतर रशियन पुढाऱ्यांविरुद्ध चौफेर आघाडी उघडली. १९६१ च्या अखेरीस सोचे नेतृत्व मानणाऱ्या यूथ फ्रंट या संघटनेने १ जानेवारी १९६२ रोजी आपण " कट्टर फेरवादी " असलेल्या क्रुश्चेव्हची प्रतिमा जाळणार आहोत, असे जाहीर केले. त्याबरोबर नॅशनल युनिटी फ्रंटच्या thein pe Myint या ज्येष्ठ मार्क्सवादी पुढाऱ्याने या कार्यक्रमाबद्दल यूथ फ्रंटवर हल्ला चढवला. या नंतर आरोप-प्रत्यारोपांच्या फैरी झडल्या. यूथ फ्रंटच्या पुढाऱ्यांनी thein Pe Myint वर मार्क्स-लेनिन वाद द्रोही असल्याचा व रंगूनमधील सोव्हिएट वकिलातीचा भाडोत्री हस्तक असल्याचा आरोप केला. vanguard या पत्राचा संपादक या नात्याने त्याने स्टॅलिनविरोधी एक " अत्यंत गलिच्छ " लेख छापण्याचे नाकारले असतांना तो लेख प्रसिद्ध करण्यासाठी सोव्हिएट वकिलातीने त्याला एक हजार क्यात ( ब्रह्मी-चलन ) ची लांच दिली असाही यूथ फ्रंटने त्याच्यावर आरोप केला.

ब्रह्मी सरकारने क्रुश्चेव्हची प्रतिमा जाळण्यास बंदी केली. पण एक जानेवारीच्या सभेत यूथ फ्रंटने एक लांबलचक निवेदन प्रसिद्ध करून त्यात क्रुश्चेव्ह यांना फेरवादी व " आंतरराष्ट्रीय संधिसाधु " अशा शेलक्या विशेषणांचा अहेर देऊन त्यांचा निषेध केला. याच सभेत " मार्क्सवादी फेरवादाच्या शवा"ची निदर्शक अशी एक कागदी शवपेटिका जाळण्यात आली व त्याचबरोबर १९६० साली प्रसिद्ध झालेल्या सोव्हिएट पक्षाच्या इतिहासाच्या सुधारलेल्या आवृत्तीची निदर्शक अशी एक मोठी पेटाही जाळण्यात आली. याचवेळी " मार्क्सवाद व मार्क्सवादद्रोही क्रुश्चेव्ह " या मथळ्याची एक पुस्तिकाही प्रसिद्ध करण्यात आली. या पुस्तिकेत लेनिन व स्टॅलिन यांचा












गौरव करण्यात आला आहे, विद्यमान रशियन नेत्यांवर कडाडून हल्ला करण्यात आला आहे व त्याचबरोबर माओ आणि त्याचे साथीदार यांच्यावरही कठोर टीका करण्यात आली आहे. थोडक्यात म्हणजे लाल बावटेवाल्या कम्युनिस्टांनी प्रत्येकाशी भांडण्याचा जणु काही पणच केला आहे.

ब्रह्मी कम्युनिस्ट पक्ष व नॅशनल युनिटी फ्रंट या दोनही संघटनांनी यूथ फ्रंटच्या कडव्या क्रुश्चेव्हविरोधी ( व माओविरोधी ) भूमिकेला विरोध केला. पण याचा अर्थ त्यांचा क्रुश्चेव्हना संपूर्ण पाठिंबा आहे असा नाही. १९६१ च्या नोव्हेंबरमध्ये ब्रह्मी कम्युनिस्ट पक्षाच्या पेकिंगमधील प्रतिनिधीने अल्बानियाच्या मुक्तिदिनाच्या समारंभाच्या निमित्ताने अल्बानियन पुढाऱ्यांना अभिनंदनपर संदेश पाठवला. ब्रह्मी पक्षाचा कल सर्वसाधारणतः तटस्थतावादी गटाकडे आहे. या उलट नॅशनल युनिटी फ्रंट ही संघटना ठळकपणे मॉस्कोवादी आहे. म्हणजेच आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत सध्या अस्तित्वात असलेले सगळे प्रवाह व सगळया प्रवृत्ती ब्रह्मदेशात थोड्याफार प्रमाणात आढळून येतात असे म्हणावयास हरकत नाही.

आग्नेय आशियातील इतर कम्युनिस्टांच्या भूमिका व हालचाली यांच्याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाही. आणि जी माहिती उपलब्ध आहे ती फारशी विश्वासार्ह नाही. पण सर्वसाधारणपणे या देशात चिनी कम्युनिस्टांचा प्रभाव आढळतो. थायलंडमध्ये कम्युनिस्टांचा प्रभाव वाढत असल्याची चिन्हे आहेत तिथे कम्युनिस्टांना पाठिंबा आणि मदत दोन ठिकाणाहून मिळतात : थायलंडच्या सरहद्दीवरील पाथेट लाओ व व्हिएटनामी कम्युनिस्टांकडून व लाल चीनकडून पकडलेल्या थायी कम्युनिस्ट पुढाऱ्यांनी दिलेल्या माहितीवरून असे दिसून येते की थायी कम्युनिस्टांचा कार्यक्रम व डावपेच चिनी कम्युनिस्टांच्या ऐतिहासिक अनुभवांवर आधारलेले आहेत : शेतकऱ्यांना वश करून घेण्यासाठी आवश्यक असा कार्यक्रम स्वीकारणे, एकसंघ राष्ट्रीय चळवळ उभारण्याचा प्रयत्न करणे, विशिष्ट संयुक्त आघाडीचे राजकारण खेळणे व अखेरीस लष्करी आघाडी उघडण्यासाठी एखाद्या विशिष्ट प्रादेशिक टापूत आपला स्वतंत्र प्रादेशिक अंमल प्रस्थापित करणे— हे सारे घटक त्यांच्या कार्यक्रमात आढळतात. मलायशियातील कम्युनिस्टांनीही याच प्रकारच्या डावपेचाचा अवलंब केलेला आढळतो. या विभागातील कम्युनिस्ट पुढारी बहुसंख्येने चिनी वंशाचे आहेत आणि त्यांना मदत प्रामुख्याने इंडोनेशियन कम्युनिस्टांकडून व लाल चीनकडून मिळते. थायी व मलायन कम्युनिस्ट पक्षाने १९६१ च्या नोव्हेंबरमध्ये अल्बानियन पुढाऱ्यांना अभिनंदनाचा संदेश पाठवला होता याचा उल्लेख सुरुवातीला आला आहेच.

— ५ —

आग्नेय आशियात अशा रीतीने रशियाची पीछेहाट झाली आहे. पण या पीछेहाटीची थोडीशी भरपाई अलीकडे भारतीय कम्युनिस्ट पक्षात रशियाला जो पाठिंबा मिळाला त्याने झाली आहे. अर्थात् हा विजय तत्काळ अगर सहजासहजी मिळालेला नाही. व तोही संपूर्ण नाही. अनेक महिने टाळाटाळ केल्यानंतर अखेरीस भारतीय कम्युनिस्ट पक्षाने आपली भूमिका अधिकृतपणे जाहीर केली ती प्रामुख्याने मास्कोवादी होती. ही घटना महत्त्वाची होती. कारण या पक्षाच्या मार्गात अनेक अडचणी असल्यातरी तो भारतातील एक प्रभावी राजकीय पक्ष आहे. १९६२ च्या फेब्रुवारीतील सार्वत्रिक निवडणुकात तो प्रमुख विरोधी पक्ष म्हणून निवडला गेला हे लक्ष्यात ठेवणे जरुर आहे.

१९६२ च्या मध्यापर्यंत स्टॅलिनविरोधी मोहीम व अल्बानिया या प्रश्नांवर पक्षांतर्गत तीव्र मतभेदांमुळे भारतीय कम्युनिस्टाना अधिकृत भूमिका स्वीकारणे शक्य झाले नव्हते. यापूर्वी अनेक महिने राष्ट्रीय कार्यकारिणीत मध्यवर्ती व उजव्या गटांच्या पुढाऱ्यांची युति झाली आहे, या युतीने पक्षाचे राष्ट्रीय नेतृत्व काबीज केले आहे आणि या युतीचा कल मास्कोकडे झुकणारा आहे, हे उघड दिसून येत होते. पण भारतातील इतर पक्षाप्रमाणेच कम्युनिस्ट पक्षातही राष्ट्रीय नेतृत्वाचा प्रभाव कमी होत आहे व प्रादेशिक नेतृत्वाचा प्रभाव वाढत आहे. हे स्थित्यंतर म्हणजे या पक्षातही फुटीर प्रवृत्ती वाढीस लागल्या असल्याचे चिन्ह आहे पश्चिम बंगाल सारख्या काही राज्यात तर पक्षाचे नेतृत्व कडव्या चीनवादी गटाकडे आहे.

१९६२ च्या जानेवारीत पक्षाचे सरचिटणीस अजय घोष मृत्यू पावले. यापूर्वी मॉस्कोवादी व चीनवादी गटांना बाह्यात्कारी एकोप्याने नांदविण्याचे नाजुक काम घोष यांनी पार पाडले होते. रशियन कम्युनिस्ट










पक्षाच्या २२ व्या अधिवेशनात घोष यांनी भाषण केले. त्यात अल्बानिया, स्टॅलिनविरोधी मोहीम वगैरे विवाद्य प्रश्न टाळण्यात आले होते. या अधिवेशनाला हजर रहाण्यासाठी भारतीय कम्युनिस्टांचे जे प्रतिनिधी-मंडळ मॉस्कोला गेले होते त्या मंडळातच या प्रश्नांवर कडाक्याचा वाद माजला होता. या अधिवेशनानंतर काही महिने पक्षाच्या राष्ट्रीय मुखपत्रात व्यक्तिपूजेचा संप्रदाय व अल्बानियन पुढारी यांच्यावर हल्ला करणारी सोव्हिएट पुढाऱ्यांची अनेक भाषणे प्रसिद्ध करण्यात आली होती. पण विरोधी बाजूला या मुखपत्रात स्थान देण्यात आले नव्हते. १० डिसेंबर १९६२ रोजी अजय घोष यांनी सोव्हिएट पक्षाच्या २२व्या अधिवेशनावर एक प्रदीर्घ निवेदन प्रसिद्ध केले. सर्वसाधारणतः मॉस्कोला अनुकूल असा त्याचा सूर होता. अर्थात् या निवेदनाची भाषा अत्यंत सावध होती व पक्षाची अधिकृत भूमिका म्हणून ते प्रसिद्ध करण्यात आले नव्हते. पण त्यात अजय घोष यांचा वैयक्तिक कल कोणत्या बाजूला आहे हे स्पष्ट दिसून येत होते.

दरम्यान भारत-चीन सीमा प्रश्नावर अजय घोष व पेकिंग यांच्यामध्ये जाहीर वाद निर्माण झाला. १९६१ मध्ये नोव्हेंबरच्या अखेरीस भारत सरकारने सीमेवर लाल चीनने नवे आक्रमण केले असल्याचे जाहीर केले. त्यावेळी अजय घोष यांनी जाहीर पत्रक काढून चीनने अशी प्रक्षोभक कृत्ये करणे बंद करावे असा कम्युनिस्ट पक्षातर्फे चिनी सरकारला इशारा दिला. यानंतरच्या वक्तव्यात भारतीय भूमीवर कोणीही आक्रमण केले तर त्याचा भारत सरकारने प्रतिकार करावा अशी त्यांनी भूमिका घेतली. या त्यांच्या भूमिकेमुळे १३ जानेवारी १९६२ रोजी अजय घोष मृत्यू पावेपर्यंत त्यांचे व पेकिंगचे शाब्दिक युद्ध चालू होते. या युद्धात दोनही बाजूकडून कडक शब्दांच्या फैरी झाडल्या जात होत्या भारत-चीन सीमा प्रश्नावरील एका प्रदीर्घ निवेदनात पेकिंग रेडिओने घोष यांच्यावर प्रखर टीका केली होती, तर ३ जानेवारी १९६२ रोजी पक्षाच्या सभेत केलेल्या आपल्या शेवटच्या भाषणांत घोष यांनी आपल्या भूमिकेचा पुनरुच्चार केला होता. या भाषणात त्यांनी "गोवामुक्तीच्या घटनेने भारत सरकारच्या परराष्ट्रीय धोरणाचे कम्युनिस्ट पक्षाने केलेले मूल्यमापन बरोबर आहे व चिनी कम्युनिस्टांनी केलेले मूल्यमापन चुकीचे आहे, हे सिद्ध केले आहे" असे ठामपणे प्रतिपादले. इतकेच नव्हे तर भारतीय कम्युनिस्ट पक्षावर लाल चीनने केलेली टीका म्हणजे मित्रपक्षाच्या अंतर्गत घडामोडीत चिनी कम्युनिस्ट पक्षाकडून करण्यात आलेला असमर्थनीय हस्तक्षेप आहे, असाही त्यांनी आक्षेप घेतला. यानंतर दहाच दिवसांनी अजय घोष मृत्यु पावले. त्यांच्या मृत्यूनंतर चिनी वृत्तपत्रात त्यांच्याबद्दल प्रसिद्ध झालेला शोकप्रदर्शन मजकूर अत्यंत त्रोटक होता यात काहीच आश्चर्य नव्हते.

अजय घोष यांच्या भूमिकेला बहुसंख्य पक्षपुढाऱ्यांचा पाठिंबा होता हे निःसंशय. पण तरीही त्यांना "डाव्या" गटाकडून जोराचा विरोध होत होताच. स्टॅलिनचे शव लाल चौकातील थडग्यातून उकरून काढून दुसरीकडे हलवण्याच्या क्रुश्चेव्ह यांच्या निर्णयावर केरळ राज्य कम्युनिस्ट पक्षाच्या मुखपत्राने कडाडून हल्ला केला. तर उलट स्टॅलिनच्या गुणदोषांबद्दल माजलेली ताणाताणी कमी करण्याच्या हेतूने नंबुद्रीपाद यांनी "स्टॅलिनवरील सोव्हिएट नेत्यांची टीका भारतीय कम्युनिस्टांच्या दृष्टीने अप्रस्तुत आहे. कारण भारतीय कम्युनिस्ट चळवळीला स्टॅलिनवादातील फक्त हितकारक घटकांचाच अनुभव आला आहे," असे मत व्यक्त केले. गुजरात राज्य शाखेच्या एका गटाने स्टॅलिनवरील अतिरेकी व गैरवाजवी टीकेचा जाहीर निषेध केला. तर पश्चिम बंगाल शाखेच्या मुखपत्रात क्रुश्चेव्ह यांच्या टीकेला जळजळीत भाषेत उत्तर देणारे अल्बानियन पुढारी होक्झा यांचे भाषण पुनर्मुद्रित करण्यात आले. पक्षाच्या मध्यवर्ती कार्यकारिणीत डाव्या गटाच्या पुढाऱ्यांची संख्या सुमारे एकतृतीयांश इतकी होती. त्यांचा प्रभाव विशेषतः पश्चिम बंगाल, व आंध्र या राज्यात प्रकर्षाने आढळून येत होता. आणि उत्तर प्रदेश, केरळ व पंजाब या राज्यातही त्याना बराचसा पाठिंबा लाभला होता.

भारतीय कम्युनिस्ट पक्षाच्या राष्ट्रीय समितीची बैठक अखेरीस १९६२ च्या एप्रिलमध्ये भरविण्यात आली. या बैठकीत सात दिवसांच्या कडाक्याच्या वादविवादानंतर पक्षाच्या प्रमुख पदाधिकाऱ्यांच्या निवडीबाबत सर्वमान्य तडजोड स्वीकारण्यात आली. "उजव्या" गटाचे अध्वर्यु व चीनचे टीकाकार असलेले श्री. अ. डांगे यांना पक्षाचे अध्यक्षपद देण्यात आले व मध्यममार्गी पण डावीकडे झुकणारे नंबुद्रिपाद यांची सरचिट-








णीस म्हणून निवड करण्यात आली. पण देशात नुकत्याच पार पडलेल्या सार्वत्रिक निवडणुका आणि सोव्हिएट पक्षाचे बाविसावे अधिवेशन यापैकी कोणत्याही विषयावर या बैठकीत सर्वसंमत असे निवेदन तयार करणे शक्य झाले नाही. जूनच्या अखेरीस पक्षांतर्गत मतभेदास कारणीभूत झालेल्या तात्त्विक प्रश्नांचा विचार करण्यासाठी मध्यवर्ती कार्यकारिणीची पाच दिवस बैठक भरली. यानंतर ऑगस्टच्या मध्यावर राष्ट्रीय समितीची हैद्राबाद येथे आठवडाभर बैठक भरली, व त्यात सर्वसाधारणपणे क्रुश्चेव्ह यांच्या भूमिकेला पाठिंबा देणारा ठरावाचा कच्चा मसुदा संमत करण्यात आला.

अल्बानिया आणि स्टॅलिनविरोधी मोहीम या प्रश्नांवर भारतीय कम्युनिस्ट पक्षाची अधिकृत भूमिका सारांशाने पुढीलप्रमाणे आहे :

सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाच्या २० व्या अधिवेशनातील निर्णयांमुळे जागतिक कम्युनिस्ट चळवळीत नव्या विचारप्रवृत्तींचा प्रादुर्भाव झाला आहे. त्यामुळे कम्युनिस्ट चळवळीत मतभेद निर्माण होणे अपरिहार्य आहे. पण अल्बानियन पुढाऱ्यांनी रशियन नेत्यांवर जो हल्ला केला तो खेदजनक व "अत्यंत असमर्थनीय" होता. जागतिक कम्युनिस्ट चळवळीत सध्या जो बखेडा माजला आहे त्यामुळे फक्त जगातील साम्राज्यवादी व प्रतिगामी शक्तींचाच फायदा होणार आहे. कम्युनिस्ट चळवळीतील मतभेद १९६० च्या मॉस्को निवेदनात निर्दिष्ट केलेल्या पद्धतीनुसार मिटवण्यात यावेत.

व्यक्तिपूजेच्या संप्रदायाच्या प्रश्नावर निर्णय घेताना सोव्हिएट नेत्यांनी अपवादात्मक धैर्य प्रकट केले आहे. अर्थात् स्टॅलिनच्या स्वभावातील व कामगिरीतील चांगले व वाईट दोनही घटक लक्षात ठेवणे जरूर आहे. स्टॅलिन हा थोर मार्क्स-लेनिन-वादी पुढारी होता व सोव्हिएट रशियात समाजवादाची स्थापना करण्याच्या व जागतिक कम्युनिस्ट चळवळीच्या संवर्धनाच्या कार्यात त्याचा मोठा वाटा आहे. स्टॅलिनची ही कामगिरी कोणालाही नाकारता वा इतिहासातून पुसून टाकता येणार नाही. पण त्याचबरोबर त्याच्या अखेरीच्या काळात त्याच्या स्वभावातील दोष वाढीस लागले व व्यक्तिपूजेला ऊत आला. अनेक अत्याचार व गुन्हे घडले. ते सारे प्रकाशात आणणे जरूर होते. या प्रश्नाची छाननी आजवर झाली आहे त्यापेक्षा जास्त वस्तुनिष्ठ व आत्मसंशोधक दृष्टीने होणे जरूर आहे. स्टॅलिनविरोधी मोहिमेमुळे "पक्ष कार्यकर्त्यांमध्ये थोडाफार गोंधळ निर्माण झाला आहे", हे खरे आहे. सोव्हिएट नेत्यांची सर्वच कृत्ये वा वक्तव्ये–विशेषतः स्टॅलिनच्या शवाचे उच्चाटण व अनेक रशियन शहरांच्या नावातील बदल –पक्षाला मान्य आहेत असे नाही. पण सोव्हिएट नेत्यांनी पक्षीय नेतृत्वाच्या व संघटनेच्या कार्यपद्धतीत लोकशाहीला वाढता वाव देण्याचा जो मूलभूत निर्णय घेतला आहे, तो स्वागतार्ह व अनुकरणीय आहे.

भारतीय कम्युनिस्ट पक्षाच्या या निवेदनात 'डाव्या गटाला चुचकारण्याची प्रवृत्ति दिसून येत होती व त्याचप्रमाणे प्रत्येक शब्द व वाक्प्रचार अत्यंत सावधपणे योजल्याचे जाणवत होते. यामुळे भारतातील बहुतेक सर्व वर्तमानपत्रांनी हे निवेदन म्हणजे डाव्या व उजव्या गटांमधील तडजोडीचा तर्जुमा आहे असा अभिप्राय व्यक्त केला. पण ही तडजोड स्पष्टपणे मॉस्कोकडे झुकणारी होती. आणि हा रशियानुकूल कल पक्षाच्या वरिष्ठ नेतृत्वातील निरनिराळ्या परस्परविरोधी गटांच्या सामर्थ्याचे निदर्शक होता.

यानंतर १९६२ च्या सप्टेंबर– ऑक्टोबरमध्ये लाल चीनने भारतावर आक्रमक हल्ला केला. ऑक्टोबरच्या अखेरीस कम्युनिस्ट पक्षाच्या राष्ट्रीय समितीची बैठक भरली व त्यात दोन दिवस कडाक्याची चर्चा होऊन १ नोव्हेंबर १९६२ रोजी चिनी आक्रमणाच्या प्रश्नावर एक ठराव संमत करण्यात आला. या ठरावात भारताचे सार्वभौमत्व कायम टिकवण्यासाठी सर्व भारतीयांनी एकजुटीने चिनी आक्रमणाचा प्रतिकार करावा असे आवाहन करण्यात आले. पक्षातील पेकिंगवादी गटाने भारताने चीनशी तत्काळ वाटाघाटी सुरू करण्याची मागणी करणारा ठराव संमत करण्याचा आग्रह धरला होता. पण अत्यंत वादळी चर्चेनंतर अखेरीस मॉस्कोवादी गटाने चीनविरोधी ठराव दोन तृतीयांश मतांनी संमत करून घेण्यात यश मिळवले, व एक तृतीयांश सभासदांनी या ठरावाला विरोध केला. भारतीय कम्युनिस्ट पक्षात इतकी खोलवर दुफळी कधी पडली नव्हती.

–(अपूर्ण)








श्री. गजानन गणेश भावे

# फलज्योतिष : शास्त्र की लोकभ्रम ?

## फलज्योतिषाची पकड

फलज्योतिष या विषयाचा समतोल दृष्टीने विचार करणाऱ्या मनुष्यापुढे असा एक बिकट प्रश्न उभा राहतो की, खरोखरच पूर्वीपासून लोक समजत आले, त्याप्रमाणे आपणही त्याला शास्त्र मानावे की, आज नवीन कल्पना ज्या आपल्यापुढे उभ्या आहेत, त्या विचारात घेऊन, तो एक लोकभ्रमाचाच प्रकार आहे असे समजून त्याकडे दुर्लक्ष करावे ? या विषयावर, अतिशय पुरातन कालापासून, जगातील सर्वच देशात थोडा बहुत विचार झाला असून आपल्याकडे तर त्यासंबंधी ग्रंथसंपत्तीही खूपच मोठी आहे, आणि अनेक मोठमोठ्या ऋषींची नावे त्याच्यामागे उभी आहेत ! आपण आता या विसाव्या शतकात वावरत आहो; तेव्हा नवीन शास्त्रीय शोधांची आणि त्यामुळे पुरातन कल्पनांना बसत असलेल्या हादऱ्यांची आपल्याना ओळख नाही, असे म्हणणेही ढोंगीपणाचे ठरेल; पण लोकभ्रमाच्या इतर प्रकारांना नवीन विचारसरणीमुळे समाजातून काढता पाय घ्यावा लागत असला तरी, फलज्योतिषाची मात्र सामाजिक मनावरील पकड फारशी ढिली झाल्याचे दिसत नाही, ही गोष्टही तितकीच खरी आहे ! अलीकडे प्रत्येक वाचकाच्या एक गोष्ट लक्षात येतच असेल की, कोणतेही साप्ताहिक किंवा मासिक आपण चाळू लागल्यास त्यात कोठेतरी "तुमच्या राशीचे ग्रहमान" "आठवड्याचे राशिभविष्य" किंवा 'Lead kindly Stars' अशा एखाद्या सदराखाली दिलेला काही मजकूर निश्चितच आढळतो; आणि ही स्थिती देशी भाषेतील नियतकालिकांचीच आहे असे नसून इंग्रजी नियतकालिकांना देखील असा मजकूर कोठे तरी देऊन, आपल्या वाचकवर्गाचे कोड पुरविणे भाग पडत असावे असे दिसते ! यावरून असे स्पष्ट दिसून येते की, समाजात शिक्षणाचे प्रमाण वाढत असल्याचे आकडेशास्त्राच्या करामतीने दाखवता आले तरी त्याच्या वैचारिक पातळीत मात्र किमपिही फरक झालेला नाही ! समाजाची वैचारिक प्रगति नुसत्या शिक्षणाने होत नाही तर त्याकरिता समाजाची आर्थिक स्थितीही उंचावली पाहिजे; असे समाजशास्त्र्यांचे मत आहे; आणि आर्थिकदृष्ट्या खालावलेल्या सुशिक्षित समाजात गुन्हेगारीचे वाढते प्रमाण पाहिले म्हणजे, या मतात बरेच तथ्य असावे, असे वाटू लागते. मानसशास्त्राने देखील वेड लागणाऱ्या कारणांची चिकित्सा करताना पन्नास टक्के कारणे आर्थिक प्रतिकूलतेमुळे उत्पन्न झालेली असतात असे स्पष्ट विधान केले आहे ! फलज्योतिषासारख्या या भ्रामक शास्त्राकडे पहाण्याच्या समाजाच्या प्रवृत्तीच्या मूळाशीही हेच असावे; आणि 'मागणी तसा पुरवठा' हे व्यापारी तत्व लक्षात घेऊन संपादकवर्गाला आपल्यात एखाद्या 'म्हापणकरा'ची योजना करणे अवश्य होत असावे.

## ज्योतिःशास्त्र आणि फलज्योतिष ह्यांची गल्लत

पाश्चात्त्य शिक्षणाने संपन्न पण वृत्तीने सनातन असलेला असा एक बराच मोठा वर्ग अद्यापि समाजात आहे; आणि त्या वर्गाचा साधारणतः असा दावा असतो की; स्वप्न, शकुन, मंत्र, तंत्र किंवा हस्तसामुद्रिक असे जे भ्रामक प्रकार समाजात रूढ असल्याचे दिसते, त्यांच्या पङ्क्तीला ज्योतिष शास्त्र बसवणे मात्र योग्य होणार नाही. त्याला कारण ते असे देतात की, ज्योतिष शास्त्र हे चन्द्रसूर्यादि ग्रहांच्या गति–स्थितीवर आधारलेले असून ते ग्रह आणि त्यांची गति–स्थिति या गोष्टी प्रत्येक मनुष्याला दृष्टिगम्य आहेत. "प्रत्यक्षं ज्योतिषं शास्त्रं चन्द्रार्कौ यत्र साक्षिणौ" असे एक जुने वाक्यही ते प्रत्येक आक्षेपकाच्या तोंडावर फेकीत असतात ! वरील वाक्य आमच्या परिचयाचे नाही, असे थोडेच आहे ? पण ज्योतिःशास्त्र आणि फलज्योतिष या दोन शब्दांची गल्लत न करता त्यांचा उपयोग केला तरच ते खरे आहे, असे आम्हास वाटते. ज्योतिःशास्त्र (Astronomy) आणि फलज्योतिष (Astrology) या दोन विषयांची आपल्याकडील



अनुक्रमणिका








ज्योतिषविषयक ग्रंथात अशी खिचडी झाली आहे की, हे दोन विषय वेगळे आहेत अशी कोणासही कल्पनाच येणे शक्य नाही. अर्थात् ही स्थिति आपल्याकडेच आहे असे नसून पाश्चात्य देशातील पंडित देखील, ग्रहगणित आणि ग्रहफलित ( Astronomy & Astrology ) या दोन विषयात पंधराव्या शतकाच्या अखेरपर्यंत फारसा फरक मानीत नसत. सोळाव्या व सतराव्या शतकातील खगोल शास्त्रज्ञ आणि गणितज्ञ, कोपर्निकस, गॅलिलिओ, केप्लर, टायक्रोब्राहे इत्यादि संशोधकांनी प्रथम सूर्य, पृथ्वी व ग्रहमाला यांची स्थाने निश्चित केली, आणि त्यांचे परस्परांवर व सर्वांचे पृथ्वीवर भौतिकदृष्ट्या काय काय परिणाम होणे शक्य आहे, याविषयी काही अनुमाने बांधून जगाला त्यांची माहिती दिली ! ही अनुमाने फलज्योतिषाच्या विचारसरणीला पोषक नसल्यामुळे पाश्चात्य देशात या दोन विषयांची तेव्हापासून फारकत झाली असे म्हणणे योग्य होईल. खरे पाहिले तर फलज्योतिष या विषयाची जगातील प्रत्येक मानवसमाजात स्वतंत्रपणे वाढ झाली असेच मानले पाहिजे. कारण नक्षत्रपट व त्यातच मधून हालचाल करणारे चलद्गोल यांचे दर्शन सर्वच मानव समाजातील जाणत्या व्यक्तींना प्रत्यही होत असल्यावर, त्यातील काहींनी, अधिक सूक्ष्म निरीक्षण करून, त्यांचे परस्परातील संबंध व सापेक्ष गति याविषयी काही नियम ठरवले, आणि काही ठोकळ अनुभव विचारात घेऊन पृथ्वीवरील भौतिक जीवनावर अथवा व्यक्तिशः मानवी जीवनावर त्यामुळे घडून येणारे परिणाम लिहून ठेवले तर त्यात खरोखर आश्चर्य ते कसले ? आश्चर्य हेच की, नवीन शोधांची आता आपल्याना पूर्ण माहिती झाल्यावरही. स्वतंत्रपणे विचार करून, खरोखर शास्त्र म्हणून जोपासलेल्या या विषयाला, आता आपण किती किंमत द्यावयाची, याविषयी नुसता विचार करण्यासही अद्यापि आपण तयार नाही ! असो.

## ज्योति:शास्त्राची परंपरा

ज्योतिःशास्त्राची परंपरा फार पुरातन आहे, ही गोष्ट प्रत्येक मनुष्याला मान्य करावी लागेल, आणि ती निर्विवादपणे मान्य व्हावी असे पुरावेही आहेत. ईजिप्त, खाल्डिया आणि बाबिलोन या प्राचीन राष्ट्रांनी प्रथम ज्योतिःशास्त्राचा पाया घातला आणि त्यानंतर त्याचा इतर राष्ट्रांतून प्रसार झाला, असा युरोपियन पंडितांचा दावा आहे. तो मात्र सर्वस्वी खरा आहे असे मानता येत नाही. फार प्राचीन काली ज्योतिषविषयक कल्पनांची अनेक भागात देवघेव झाली, हे जसे शक्य आहे, त्याप्रमाणेच, एखादी कल्पना निरनिराळ्या राष्ट्रात उत्स्फूर्त होऊन निरनिराळ्या काळी तिची स्वतंत्रपणे वाढ होणे व अखेर त्या कल्पनेला शास्त्रीय स्वरूप येऊन तिला सर्वमान्यता प्राप्त होणे, ही गोष्ट देखील शक्य आहेच. याकरिता उदाहरणच द्यावयाचे झाले तर ते गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांताचे देता येईल. गुरुत्वाकर्षणाचा शोध सतराव्या शतकात न्यूटनने लावला, ही गोष्ट चौथ्या इयत्तेत शिकणारे १०।१२ वर्षाचे मूलही आता सांगेल, हे कोणाला माहिती नाही ? पण दहाव्या शतकात जन्मलेले प्रसिद्ध भारतीय ज्योतिषी आणि गणिती भास्कराचार्य यांच्या लीलावती ग्रंथातील गोलाध्याय ११-१४ मध्ये "पृथ्वीला आकर्षणशक्ति आहे, त्या शक्तीने ती प्रत्येक वजन असलेला पदार्थ आपल्याकडे खेचून घेते, त्यामुळे तो पदार्थ पृथ्वीवर पडला, असा भास होतो" ( आकृष्टशक्तिश्च मही तया यत्खस्थं गुरुं स्वाभिमुखं स्वशक्त्या ॥ आकृष्यते तत्पततीव भाति ॥ ) असे स्पष्ट वाक्य आहे; आणि हे वाक्य पाहिल्यानंतर गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धांतासंबंधी न्यूटनने काही निराळे सांगितले असे आपल्यास तरी म्हणता येईल काय ? पण असे असूनही गुरुत्वाकर्षणाच्या शोधाचे जनकत्व न्यूटनकडून निघून ते भास्कराचार्यांकडे जाते, असे कोण म्हणेल ? कारण एक तर न्यूटनने आपला सिद्धांत विद्वानांना पटेल अशा रीतीने सोपपत्तिक रीतीने त्याची मांडणी करून तो प्रसिद्ध केला आहे; तसे भास्कराचार्यांनी मुळीच केले नाही; आणि दुसरी गोष्ट म्हणजे वरील त्यांच्या वाक्यात नमूद केलेली कल्पना, त्यांची स्वतःची असेल असे मानण्यास पण मुळीच आधार नाही. त्यांच्यासमोर त्यावेळी असलेल्या पूर्वीच्या एखाद्या ग्रंथातील कल्पना त्यानी प्रसंगाने आपल्या ग्रंथात उद्धृत करून घेतली, असे असण्याचाच बराचसा संभव आहे. याचाच अर्थ असा की, एखादी कल्पना निरनिराळ्या व्यक्तींना निरनिराळ्या काळी उत्स्फूर्त होते, व तिचे स्वतंत्रपणे संवर्धन होऊन तिची शास्त्रात परिणति होणे, हे देखील शक्य असल्याचे मानावे लागते !








फार प्राचीन काळी दळणवळणाच्या साधनांच्या अभावी कोणी कोणाची उसनवारी केली असे म्हणण्यापेक्षा प्रत्येकाने स्वतंत्रपणे कल्पनांची वाढ केली असे मानणेच अधिक उक्त नाही काय ? भारतीय ज्योतिःशास्त्राच्या दोन्ही शाखांची ( Astronomy आणि Astrology ) परंपरा इतकी जुनी आहे की, त्यानी काही उसनवारी केली असल्यास त्यांच्या ग्रंथावरूनच तिचा सहज बोध होण्यासारखा आहे.

## भारतीय ज्योतिःशास्त्र

ज्योतिःशास्त्रविषयक अत्यंत प्राचीन भारतीय उल्लेख म्हणजे ऋग्वेदातील होय. ऋग्वेद मंडळ ५ सूक्त ४० मधील ऋचा ५ ते ९ मध्ये सूर्यग्रहणासंबंधी माहिती असून त्याप्रसंगी लोकांची कशी वत्रराट झाली, आणि अत्रिऋषीने आपल्या सामर्थ्याने ( तुरीय ब्रह्माच्या साह्याने ) लोकाना कसा दिलासा दिला, त्याचे काहीसे काव्यमय वर्णन आले आहे. ज्योतिषविषयक ग्रंथकारात बृहस्पति, भृगु, गर्ग, अत्रि, अशी नावे येतात, आणि हे सर्व ऋषि खि. पू. २००० वर्षांपूर्वीचे असावेत ही गोष्ट तर निश्चितच. ऋग्वेदाचा बराचसा भाग खि. पू. ४५०० वर्षांहून अलीकडे आणता येत नाही; असे कै. लो. टिळकांनी आपल्या 'मृगशीर्ष' (Orion) या ग्रंथात सप्रमाण सिद्ध केले आहे, आणि त्यांचे ते मत आता विद्वन्मान्यही झाले आहे. ऋग्वेदात आपण सध्या वापरीत असलेली नक्षत्रांची नावे सुसंगत अशी कोठेही आढळत नाहीत पण तैत्तिरीय ब्राह्मणात ती अनुक्रमाने आढळतात. फक्त त्याचा आरंभ कृत्तिकापासून धरला आहे. वसंतसंपात त्यावेळी कृत्तिकात होत असे. आता तो मागे आला असून सध्या नक्षत्रांचा आरंभ आपण अश्विनीपासून धरतो; आणि तो आणखी मागे नेऊन रेवती आरंभस्थान मानणे अवश्य आहे, असे सध्या विद्वानाचे मत दिसत आहे. पुढील वैदिक वाङ्मयात नक्षत्रांची नावे अनेक ठिकाणी पहाण्यास मिळतात. त्यानंतरच्या काळातील 'वेदांगज्योतिष' नावाचा एक लहानसा ग्रंथ प्रचारात आहे. त्याचा काल खि. पू. १००० वर्षे असावा. ज्योतिषविषयक अनेक उल्लेख त्यापूर्वीच्या आणि नंतरच्या संस्कृत ग्रंथातून दिसून येतातच; पण ज्योतिषविषयावरील स्वतंत्र ग्रंथसंपत्तिही या कालात बरीच तयार झाली असावी. फक्त ती उपलब्ध नाही व काहींचा कालनिर्णय निश्चित करण्यासारखा पुरावा नाही ! खि. पू. १०० ते खिस्ताब्द २००, या अवधीत केव्हातरी आर्यभट्ट आणि ब्रह्मगुप्त या दोन प्रसिद्ध ज्योतिःशास्त्रज्ञांचे ग्रंथ समाजापुढे आले असले पाहिजेत. त्यानंतर बहुधा खि. श. ५०० च्या आसपास वराहमिहिर या प्रसिद्ध ज्योतिष्याचा 'बृहत्संहिता' हा ग्रंथ विद्वानांपुढे आला आणि तो चांगला मान्यताही पावला. त्यानंतर अकराव्या शतकात प्रसिद्ध ज्योतिःशास्त्रज्ञ आणि गणिती पंडित भास्कराचार्यांनी 'लीलावती' नावाचा ग्रंथ लिहिला. भास्कराचार्यांच्या पूर्वीच्या व नंतरच्या ५–७ शतकात ज्योतिःशास्त्रावर भारतात तरी खूपच ग्रंथ-संपत्ति निर्माण झाली आहे, पण त्यातील बरीचशी फलज्योतिषाला वाहिलेली असून केवळ गतानुगतिक स्वरूपाची आहे असेच म्हटले पाहिजे. त्यानंतर अठराव्या शतकात गणेश दैवज्ञ नावाच्या ज्योतिष्याने 'ग्रहलाघव' नावाचा एक ग्रंथ लिहिला, पण तो केवळ करणग्रंथ असून पंचांगे तयार करण्याकरिता अवश्य ती माहिती त्यात आहे इतकेच. ग्रहलाघवीय पंचांगें त्यावरूनच केलेली असतात. वरीलपैकी कोणत्याही विद्वान ग्रंथकाराला ज्योतिषशास्त्रातील ( Astronomy ) नवीन लागलेल्या शोधांची माहिती नाही, ही गोष्ट येथे लक्षात ठेवावी.

गेल्या शंभर वर्षात देखील भारताच्या विविध भागात निरनिराळ्या भाषातून ज्योतिःशास्त्र व फलज्योतिषावर काही वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे, पण त्या सर्वांची येथे दखल घेणे शक्य नाही. पण एक गोष्ट निर्विवाद की, पाश्चात्य ज्ञानाचा प्रसार आणि त्यामुळे उत्पन्न झालेली नवीन विचारसरणी यामुळे या विषयाकडे पहाण्याचा समाजाचा दृष्टीकोन हळूहळू पण निःसंशय बदलत असून, अगदी भाषांतरे सोडल्यास, नवीन ग्रंथात नवीन संशोधनातील सर्वमान्य मुद्यांना योग्य ते स्थान निश्चित देण्यात आलेले आहे, असेच दिसून येईल. उदाहरणार्थ; कै. शं. बा. दीक्षित यांचे गेल्या शतकाच्या अखेर प्रसिद्ध झालेले 'भारतीय ज्योतिःशास्त्र' आणि 'ज्योतिर्विलास' हे ग्रंथ घ्या. हे दोन्ही ग्रंथ केवळ ज्योतिःशास्त्र ( Astronomy ) याच विषयाला वाहिलेले असून त्यात त्या विषयासंबंधी अद्यावत माहिती दिलेली आहे; इतकेच नव्हे तर तीं








माहिती देतानाही अशा मनोरंजक लेखनशैलीचा उपयोग करण्यात आला आहे की, विषय अत्यंत रुक्ष आणि क्लिष्ट असूनही, एकदा वाचकाने पुस्तक हाती घेतल्यावर ते पूर्ण केल्याशिवाय वाचकाला ते खाली ठेववणारच नाही अशी आम्हाला तरी खात्री आहे! या शास्त्रातील दोन्ही शाखांवर वेदकालापासून आजपर्यंत भारतीय विद्वानानी घेतलेल्या परिश्रमांचा वर जो थोडक्यात आढावा घेतला त्यावरून एवढे निश्चितच ठरते की फलज्योतिषाकडे भारतीयांनी जरी अधिक लक्ष दिले असे मानले, तरी ग्रहगणित अथवा ज्याला खरेखुरे ज्योतिःशास्त्र असे मानले पाहिजे, अशा शाखेकडेही भारतीय विद्वानांनी पुरेसे अवधान दिले होते, ही गोष्ट नाकारता येणार नाही.

## फलज्योतिषाची पीछेहाट

ज्योतिःशास्त्र हे कदाचित एकच शास्त्र असे आहे की, वर एका ठिकाणी म्हटल्याप्रमाणे जगातील सर्व मानवसमाजात कमी अधिक प्रमाणात त्याचे सर्वत्र संवर्धन झाले असेल. या शास्त्राच्या दोन्ही शाखांवर आजपर्यंत झालेल्या शोधांची आणि प्रगतीची थोडक्याशा जागेत नीटशी कल्पना देता येणार नाही. फक्त येथे एवढेच नमूद करावयाचे की, युरोपात पंधराव्या व सोळाव्या शतकात लागलेल्या अनेक प्रकारच्या शोधांनी या शास्त्रातील फलादेश भाग हा निराधार ठरला. ब्रिटिश ज्ञानकोशकारानी ( Encyclopedia Britanica ) फलज्योतिष ( Astrology ) या शब्दावर लिहिताना "फलज्योतिष शास्त्र या संज्ञेस आता पात्र राहिले नाही" ( Astrology as a science has ceased to exist ) असा आरंभीच जो शेरा मारला आहे त्याचा अर्थ हाच होय. भारतात किंवा जगात इतरत्र ज्याप्रमाणे पंधराव्या व सोळाव्या शतकानंतरही फलज्योतिषावर अनेक ग्रंथ झाले त्याप्रमाणे ते युरोपमध्ये देखील झाले ही गोष्ट खरी. पण त्यानंतर त्या विषयाला विद्वन्मान्यता राहिली नाही, हे देखील तितकेच खरे आहे! फार कालपर्यंत या विषयाची समाजाच्या मनावर दृढ बसलेली पकड, युरोपमध्ये झाले म्हणून एकदम ढिली पडेल, हे कसे शक्य आहे? नवीन संशोधनानी फलज्योतिषाचा पायाच उखडला जात आहे. हे निश्चितपणे समजून देखील, आपल्याकडे या विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात, या विषयाकडे आस्थेने पहाणारांचा, सुशिक्षितांतही अद्यापि बराच मोठा वर्ग आढळतो. तसाच तो युरोपमध्येही आढळल्यास त्यात आश्चर्य ते कसले? मनुष्यस्वभाव हा सर्व ठिकाणी सारखाच असणार!

फलज्योतिषाचा पाया पाश्चात्य देशात, प्रथम खि. पू. १५० च्या सुमारास, प्रसिद्ध ग्रीक ज्योतिषी टॉलेमी याने घातला, असे म्हणतात पण तेही सर्वस्वी खरे म्हणता येणार नाही. कारण त्यापूर्वीही काही शतके, इजिप्शियन, खाल्डियन्स आणि आरब ज्योतिष्यानी या शास्त्रात पुष्कळच प्रगति केली होती असे पुरावे आता पुढे आले आहेत. जगातील ज्ञानोत्पादनाचे आणि ज्ञानसंवर्धनाचे सर्व श्रेय ग्रीकांना आणि त्यांच्या संस्कृतीला देण्याची जी युरोपीय पंडितात एक 'फॅशन' आहे तिचेच अंग वरील विधान होय असे मानण्यास अडचण नाही. टॉलेमीचा या विषयावरील प्रसिद्ध ग्रंथ 'टिट्राबिकास' (Titrabiblas) हा आजही सर्वच्या सर्व उपलब्ध आहे, आणि राष्ट्रीय भविष्याचे काही अंदाजी ठोकताळे त्यावरून सांगता येतात असे म्हणतात. भारतीय पद्धतीप्रमाणे कुण्डली मांडून द्वादशभावांवरून शुभाशुभ फळे वर्तविण्याची प्रथम माहिती मिळते ती दुसरा एक ग्रीक ज्योतिषी फर्मिकस मॅटर्नस ( इ. स. ३३६–३५४ ) याच्या ग्रंथावरून. इ. स. ५०० पासून इ. स. १५०० मधला एक हजार वर्षांचा काळ हा युरोपमध्ये मध्ययुगीन काल म्हणजे धर्ममार्तंडांच्या सत्तेचा काळ होता हे प्रसिद्धच आहे. त्या कालात रूढ कल्पनांच्या विरुद्ध तोंडातून 'ब्र' काढण्याचीही कोणाची छातीच नसे! खरे पाहता जगाचा मध्यबिंदु, आपली पृथ्वी नसून तो सूर्य आहे, ही कल्पना १५ व्या व १६ व्या शतकात, कोपर्निकस, केप्लर वगैरे गणितज्ञानी आणि ज्योतिःशास्त्रवेत्त्यानी प्रथम जगापुढे मांडली, हे देखील तितकेसे खरे म्हणता येणार नाही. त्यापूर्वी दोन हजार वर्षे म्हणजे, खि. पू. ३०० च्या सुमारास, ग्रीक गणितशास्त्रज्ञ आणि ज्योतिषी, आरिस्टॉर्कस, याने तत्कालीन विद्वानांपुढे तेच सिद्धांत मांडले होते, पण त्यावेळी ते मान्यता पावले नाहीत, आणि नंतरच्या काळात ते पूर्णपणे विसरले गेले! नवीन शोध लागल्या-नंतर अगदी अलीकडील काळात, युरोपमध्ये फल-

ज्योतिषाचे पुरस्कर्ते व ग्रंथकार अनेक झाले आहेत; त्यात, लिली, रॅफेल, सेफारियल, डॉ. सेमोनाईट, ही नावे सर्वश्रुत आहेत, आणि चीरोचे नाव तर, आपल्याकडेसुद्धा प्रत्येकाच्या तोंडात आढळते. पण हे सर्व विद्वान ग्रंथकार आपल्या ग्रंथात नवीन लागलेल्या शोधांची कोठेही दखल घेताना आढळत नाहीत, त्या अर्थी नवीन शोधांवर एक तर त्यांचा विश्वास नसावा, अथवा स्वतःच्या मनःप्रवृत्यनुसार अशा शोधांकडे ते बुध्या दुर्लक्ष करीत असावेत, याहून निराळे काहीच अनुमान करता येण्यासारखे नाही !

## शास्त्र की धंदा ?

सर्व पौर्वात्य आणि पाश्चात्य ज्योतिष-विषयक ग्रंथांवरून अशी एक गोष्ट निश्चित ठरते की, ग्रंथकाराच्या मते विश्वाचा मध्यबिंदु म्हणजे, आपण रहात असलेली पृथ्वी हाच असून, सूर्यादि सर्व ग्रह तिच्याभोवती चक्राकार भ्रमण करीत असतात. असे विधान कोणत्याही ग्रंथकाराने आपल्या ग्रंथात स्पष्ट शब्दात केले नाही, ही गोष्ट मान्य आहे; पण तसे विधान प्रत्यक्ष कोणत्याही ग्रंथकाराने केले नसेल तर, तसे करण्याचा सार्वत्रिक समजुतीमुळे, अद्यापपर्यंत कोणालाही प्रसंगच आला नाही; हेच त्याचे खरे कारण मानले पाहिजे. सोळाव्या व सतराव्या शतकापर्यंत हा मुद्दा विवाद्यच नसल्यामुळे, त्याचे अस्ति वा नास्तिपक्षी उत्तर देण्याचा प्रश्नच कोठे उत्पन्न होतो ? पण त्यानंतर म्हणजे इतर ग्रहांप्रमाणेच पृथ्वी हा एक ग्रह असून, सूर्य हा सर्वग्रहमालेचा केंद्रबिंदु आहे, असे शास्त्रदृष्ट्या निश्चित ठरल्यानंतर, जुन्या ग्रंथकारानी सूर्य या गोलाचे गृहीत धरलेले ग्रहत्व व त्याची पंचांगातून व कुण्डल्यातून दाखविलेली भुक्त-भोग्य स्थिति, हे काय गौडबंगाल आहे ते स्पष्ट करण्याची जबाबदारी आता त्यांच्यावर येते, असे आम्हास वाटते. कारण ज्योतिःशास्त्रातील कोणत्याही प्रश्नाचा विचार करताना, या मुद्याचा निर्णय अत्यंत महत्त्वाचा मानावा लागेल, हे अगदी उघड आहे. नवीन शोधानी विश्वाच्या विस्ताराची जी थोडी बहुत कल्पना आता आपल्याला आलेली आहे ती विचारात घेता विश्वाचा केंद्रबिंदु आपली पृथ्वी होऊ शकत नाही, ही गोष्ट तर निश्चितच ठरते. आपल्या कल्पनेची आणि साधन सामर्थ्याची भरारी आपल्या सूर्यमालेच्या पलीकडे फारशी गेलेली नाही, ही गोष्ट सामान्यपणे प्रत्येक सुज्ञाण मनुष्यास ठाऊकच आहे. शास्त्रज्ञांच्या मते आपल्या सूर्यमालेसारख्या आणखीही अनेक ग्रहमाला आहेत; आणखी अशा अनेक सूर्यमालाना आपल्याभोवती फिरत ठेवून, आणखी एक फार मोठा सूर्य, बरोबरचे सर्व लटांबर घेऊन, विश्वात लांबवर कोठे तरी जात आहे, अशीही एक कल्पना आहे ! एका शास्त्रज्ञाचे म्हणणे तर असे आहे की, विश्वात आपल्या सूर्य-ग्रहमालेसारख्या आणखी २००,०००,००० ( वीस कोटि ) ग्रहमाला आहेत ! ( पण आपली ग्रहमाला धरून की सोडून ? ) आमच्या मते शास्त्रज्ञांच्या कल्पनाशक्तीचे हे केवळ खेळ आहेत ! अशा अफाट ( Fantastic ) कल्पना घरी बसून एखाद्या आडाण्यालाही सहज करता येतील. खरोखर वीस कोटि ग्रहमालांचे क्षेत्र संपल्यानंतर पलीकडे काय आहे, हे जोपर्यंत निश्चितपणे सांगता येत नाही, तोपर्यंत विश्वातील सूर्यमालांचा विशिष्ट आंकडा निक्षून सांगणे, याला खरोखर काही अर्थच नाही. कारण मोठमोठ्या शास्त्रज्ञांच्या कल्पनेची भरारी आपल्या ग्रहमालेपलीकडे गेलेली नाही, असे एकवार मान्य केल्यावर, सामान्य मनुष्यापुढे, एक लक्ष, एक कोटि, किंवा वीस कोटि, यापैकी कोणताही आकडा ठेवला तरी त्यामुळे त्याच्या ज्ञानात कितपत आणि कसा काय फरक पडणार आहे ? आपल्या विषयापुरता मुख्य मुद्दा असा आहे की, नवीन शोधानी खगोलासंबंधीच्या पूर्वीच्या कल्पनाना पूर्ण धक्का बसला असून विश्वाचा केन्द्रबिन्दु पृथ्वी किंवा आपला सूर्य हा आता विवाद्य असा प्रश्नच राहिला नाही. आपल्या ज्योतिष विषयाची ( Astrology ) मर्यादाही विश्वापर्यंत पोचतच नाही. आपल्या सूर्यग्रहमालेचा केन्द्रबिन्दु आपला सूर्य आहे, आणि आपल्या विषयाच्या कक्षेत येणारे सर्व ग्रह-गोल, आपली पृथ्वी हा देखील त्यातीलच एक ग्रह असल्यामुळे, तिच्यासह, आपल्या सूर्याभोवती फिरतात, ही खरी वस्तुस्थिति लक्षात घेऊन यापुढे ज्योतिःशास्त्रविषयक प्रत्येक प्रश्नाकडे पाहिले पाहिजे, असे आमचे प्रामाणिक मत आहे.

प्रत्येक कुंडलीत नवग्रहांपैकी सूर्य हाही एक ग्रह मानून त्याची भुक्त-भोग्य स्थिति दिलेली असते. त्याचप्रमाणे आपल्या सर्व पंचांगात देखील पंधरवड्याची ग्रहस्थिति दर्शवताना त्यातही सूर्य कोणत्या राशीला

आहे व त्या राशीत तो किती अंशावर आलेला आहे याविषयींची माहिती असते. अर्थातच कोणत्याही पंचाग-कर्त्याने नवीन संशोधनांची या विसाव्या शतकातही दखल घेतलेली नाही, हे उघडच ठरते. पंचांगाचा उपयोग कालमापन एवढाच असेल तर तो सध्याच्या पंचांगांनी देखील साध्य होण्यास अडचण नाही, ही गोष्ट आम्हालाही मान्यच आहे. कारण सूर्य पृथ्वीसभोवती फिरला काय अथवा पृथ्वी सूर्याभोवती फिरली काय, त्यांचे एकमेकांतर होणारे भौतिक व दृश्य परिणाम जे एकापासून दुसऱ्यास उष्णता आणि प्रकाश मिळणे, किंवा एकमेक एकमेकापासून दूर किंवा जवळ आल्याने कालमापनाला होणारे साह्य, यात काहीच फरक होण्यासारखा नाही, हे अगदी खरे. पण त्याच पंचागाचा उपयोग राष्ट्रीय किंवा वैयक्तिक जीवनातील अदृश्य अशी शुभाशुभ फलिते सांगण्याकडे करण्यात येतो, तेव्हा मात्र ते कितपत बरोबर असते, असा स्वाभाविकच प्रश्न उत्पन्न होतो ! अर्थात ही गोष्ट देखील लक्षात घ्यावीच लागेल की, ग्रहफलिते वर्तवण्याकरिता प्राचीन ग्रंथांचाच जर उपयोग करावयाचा तर, ते ग्रंथ ज्या गृहीत भूमिकेवरून तयार करण्यात आले, त्या भूमिकेवरून तयार करण्यात आलेल्या पंचांगांचा उपयोग हाही ओघानेच आला, ही गोष्ट आम्हालाही समजते ! पण अशी स्वतःची समजूत करून घेताना, फलज्योतिष हे शास्त्र नसून तो एक धंद्याचा प्रकार आहे, असे मनोमन वाटू लागते, त्याला काय करणार ? फलज्योतिषात कुंडली व लग्न म्हणजे कुंडलीतील आरंभस्थान निश्चित करणे, ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट मानली जाते, हे काही कोणास सांगावयास नको; आणि लग्नस्थान निश्चित करण्याकरिता ज्या प्रसंगासंबंधी फलिते पहावयाची असतील तो प्रसंग घडल्याची बरोबर वेळ समजणे, अत्यंत आवश्यक असते ही गोष्टही प्रसिद्धच आहे. पण धंदा म्हटला की सर्व प्रकारच्या मखलाशा त्यात येणे हेही अपरिहार्यच असते ! आणि मौज अशी की, अशा मखलाशा फलज्योतिषात शिरल्या असल्याचेही सहज दाखविता येते. लग्न काढण्याकरिता घडलेल्या प्रसंगाची निश्चित वेळ समजणे अवश्य असते, असे वर म्हटलेच आहे. पण कुंडली मांडण्याकरिता बालकाची जन्मवेळ बऱ्याच अंशी बरोबर मिळू शकते, हे खरे असले तरी इतर अनेक प्रसंग असे आहेत की ज्यांची आरंभीची निश्चित वेळ कधीच मिळू शकत नाही. धंद्यातील मुख्य खुबी म्हणजे आलेले गिऱ्हाईक परत जाऊ न देणे ! हे तर प्रत्येक धंदेवाल्यास ठाऊक असतेच. निश्चित वेळ मिळत नाही असे दिसून आल्यावर बहुधा धंदेवाईक ज्योतिष्यांना त्यावर काहीतरी तोडगा काढणे अवश्य वाटले असावे, आणि वेळ मिळत नाही, अशावेळी अडून न बसता, प्रश्नवेळ हीच तो प्रसंग घडल्याची वेळ समजून, त्यानी त्यावेळी मांडलेल्या कुण्डलीवरून फलादेश सांगण्यास सुरवात केली असावी ! बालकाची जन्मवेळ टिपून ठेवलेली असते हे खरे, पण वस्तु हरवल्याची वेळ काही कोणी टिपून ठेवलेली नसते, पण ज्योतिषी लोकांना असे प्रश्नही विचारले जातात, आणि प्रश्नकालीन कुण्डली मांडून अशा प्रश्नांची उत्तरे कशी द्यावी, याचे ग्रंथांतरी विवेचनही आहे, आणि तशी प्रथा सर्वत्र रूढ पण आहे. असे ग्रंथ पूर्वाचार्य आणि ऋषि यांच्यापासून चालत आलेले आहेत, आणि तीच प्रथा चालविली जात आहे, असे कोणी म्हणेल ? त्यावर उत्तर इतकेच की, फलज्योतिषाला धंद्याचे स्वरूप पूर्वाचार्य आणि ऋषि यांच्यापासूनच आलेले आहे असे फार तर म्हणता येईल ! त्यामुळे फलज्योतिषाची शास्त्र या दृष्टीने प्रतिष्ठा वाढते, असे कसे म्हणावे ?

### फलज्योतिषातील गृहीत गोष्टी

आता यानंतर, फलज्योतिषाचे ग्रंथ ज्या मूलभूत गोष्टी गृहीत धरून निर्माण झाले आहेत, त्याच गोष्टी अ, ब, क, ड, अशा अनुक्रमाने देऊन त्यापुढे कंसात नवीन संशोधनाने त्या गोष्टीसंबंधी जी खरी वस्तुस्थिति विद्वानांच्या निदर्शनास आली तीही थोडक्यात मांडली आहे. विचारांती वाचकाला फलज्योतिषाचा शास्त्रीय दर्जा ठरवण्याच्या दृष्टीने अशी तुलनात्मक माहिती अवश्य आहे ही गोष्ट सहज लक्षात येईल.

(अ) पृथ्वी हा विश्वाचा केंद्रबिंदु असून, सूर्य, ग्रह व तारे तिच्या भोवती चक्राकार भ्रमण करीत असतात.

(विश्वाचा आदि व अंत कल्पनेनेही जाणता येत नसल्याने त्याचा केंद्रबिंदु निश्चित करणे मानवी शक्तीच्या बाहेरचे आहे. आपल्या साधन-सामर्थ्याची झेप आपल्या सूर्य-ग्रह-मालेपलीकडे फारशी गेलेली नाही. विश्वात अशा अनेक ग्रहमाला आहेत, असे

शास्त्रज्ञांचे म्हणणे आहे. आपल्या सूर्यमालेचे जे अल्पसे ज्ञान आपल्यास आहे, त्यावरून त्या ग्रहमालेचा केंद्रबिंदु आपला सूर्य आहे, एवढेच निश्चित ठरते. )

( ब ) सूर्यादि इतर ग्रहांप्रमाणेच चंद्र हाही एक ग्रह असून इतर ग्रहांप्रमाणेच तो पृथ्वी भोवती भ्रमण करीत असतो.

( सूर्यमालेतील इतर ग्रहांप्रमाणे चंद्र हा ग्रह नसून तो पृथ्वीचा उपग्रह आहे, पृथ्वीभोवती मुख्यत्वे त्याचे भ्रमण असते, पण पृथ्वीभोवती फिरता फिरता पृथ्वीबरोबरच सूर्याभोवतीही त्याची चक्कर होतेच. पृथ्वी हा देखील सूर्य-ग्रह-मालेतील एक ग्रह आहे, व तो शुक्र आणि मंगळ यांच्या मध्ये राहून सूर्याभोवती फिरतो ही गोष्ट आता सर्वमान्यच आहे. पृथ्वीप्रमाणे काही ग्रहांनाही त्यांचे त्यांचे उपग्रह– वाटल्यास त्यास त्यांचे चंद्र म्हणावे– आहेत. त्यात, गुरूला बारा, शनीला नऊ, मंगळाला दोन, युरेनसला पाच आणि नेप्चूनला दोन, असे पृथ्वीच्या चंद्राशिवाय आणखी तीस उपग्रह आतापर्यंत अवलोकनात आले आहेत. म्हणजे आपल्या सूर्याची जशी ग्रहमाला तशीच, पण त्या त्या ग्रहांच्या या छोट्या ग्रहमाला म्हणण्यास हरकत नाही. ग्रहांचे सूर्याभोवती भ्रमण हे आपआपल्या ग्रहमालेसह होते, हे आता उघडच झाले. विश्वात अनेक सूर्यमाला आहेत. या विधानाचे हेही एक प्रत्यन्तर मानले तरी चालेल ! )

( क ) सूर्य हा ग्रह पृथ्वीभोवती इतर ग्रहांप्रमाणेच फिरतो.

( सूर्याला ग्रह म्हणावयाचे किंवा नाही हाच खरोखर प्रश्न आहे. आपली ग्रहाची व्याख्याही अन्तराळात दिसणाऱ्या चलद्गोलापुरती मर्यादित आहे, ही गोष्ट मान्य करावयास पाहिजे. पूर्वाचार्यांनाही ती मान्य असावी. सूर्य या गोलाचे स्वरूप त्यास माहिती नसल्याने त्यांनी इतर ग्रहांच्या मालिकेत त्यास बसविले इतकेच. आता आपल्याला त्यास ग्रह मानिता येणार नाही, पण त्याचे स्थान मात्र ग्रहगोलापेक्षा फार श्रेष्ठ आहे. आपल्या ग्रहमालेतील प्रत्येक घटकावर घडणाऱ्या सर्व घटनांचा तो एकमेव नियन्ता आहे, एवढे सांगितले म्हणजे पुरे. पृथ्वी व इतर ग्रहांच्या संदर्भात तरी तो स्थिर आहे. आपल्या ग्रहमालेतील सर्व पसाऱ्यासह, तो आणखी एखाद्या ताऱ्याभोवती फिरत असेल तर ते समजण्याची निश्चित साधने आज तरी आपल्यापाशी नाहीत. पण उपग्रह ग्रहाभोवती फिरतात. आणि ग्रह सूर्याभोवती फिरतात, त्याप्रमाणे सूर्यही आणखी एखाद्या प्रचण्ड ताऱ्याभोवती फिरत असेल असा संभव मात्र आहे. )

( ड ) ग्रह फक्त सात. रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि आणि दोन पातबिन्दु, राहु आणि केतु, असे एकूण नऊ.

( ग्रहांची व्याख्या आकाशातील चलद्गोल अशी मानली – आणि तीच मानणे योग्य आहे – तर ती संख्या सध्यातरी १५४१ भरते. ती अशी :– बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरु, शनि, युरेनस्, नेपच्यून, हर्शेल, प्लूटो, असे दहा ग्रह; उपग्रह एकतीस – पृथ्वीच्या चन्द्रासह– आणि मंगळ व गुरु यांच्यामध्ये राहून सूर्याभोवती फिरणारे १५०० ॲस्टेराईड्स, ( Asterides ) असे सर्व मिळून १५४१ ( पंधराशे एक्केचाळीस ) होतात. आणखी काही ग्रहांचा – चलद्गोलांचा– शोध लागण्याचा संभव नाही, असे निश्चित सांगणे कठीण आहे. ) इतक्या सर्व ग्रहांनी मानव जातीला सतावण्याचे ठरविल्यास तिच्या संरक्षणासाठी सर्वशक्तिमान म्हणविणाऱ्या परमेश्वराचे सामर्थ्यही अपुरे पडेल !

फलज्योतिष हे शास्त्र असेल तर वरील प्रश्नांची संगतवार उत्तरे देण्याचा त्याच्या पुरस्कर्त्यांनी प्रयत्न केला पाहिजे. अर्थात, शास्त्र या शब्दाची व्याख्या देखील, ते म्हणतील ती, असे आता कोणी मानणार नाही. त्यांच्या दृष्टीने, स्वप्न, शकुन, मन्त्र, तन्त्र, हस्तसामुद्रिक या सर्व गोष्टी शास्त्रातच येतात ! शास्त्राची सध्याची व्याख्या म्हणजे ज्याचे मूलभूत सिद्धांत, स्थल-काल परिस्थितीने बाधित होत नाहीत ते; अशी आता विद्वन्मान्य झाली आहे. गणित किंवा भूमिति ही शास्त्रे आहेत. कारण त्यांचे मूलभूत सिद्धांत कोणत्याही कारणाने बदलत नाहीत. चार आणि आठचा गुणाकार आज बत्तीस येतो आणि पाच हजार वर्षांनी तो चाळीस येईल असे नाही, त्याप्रमाणेच तो पृथ्वीवर बत्तीस येतो आणि चन्द्रलोकावर तो निराळा येणार आहे असेही नाही. भूमिती संबंधीही असेच म्हणावे लागेल. त्रिकोणाच्या तीन कोणांची बेरीज दोन काटकोन असते. ती दहा










हजार वर्षांनी आणि शुक्र–ग्रहावर गेले तरी तशीच येणार ! ही शास्त्रे निरपवाद आहेत. पण पदार्थविज्ञानासारखी काही सापवाद शास्त्रे आहेत, तरी त्यांच्या मर्यादा काय आहेत, ते आज आपल्याला या ठिकाणाहूनही जवळजवळ निश्चित सांगता येते. चहा, साखर, पाणी इत्यादि पदार्थ घेऊन चूल पेटविली म्हणजे आपल्याला येथे चहा करून घेता येईल, हे सर्वांसच माहिती आहे; पण अंतराळात पंचवीसतीस हजार मैल उंचीवर वरील साधनांनी चहा होणार नाही ! त्याठिकाणी गुरुत्वाकर्षण आणि प्राणवायु ( oxygen ) यांचा – कदाचित आज आपल्यास कल्पनाही नसलेल्या आणखीही काही द्रव्यांचा – अभाव असेल आणि पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ जर त्या ठिकाणी तुमच्या-बरोबर येणार असेल तर तो, तेथे इष्ट अशी परिस्थती उत्पन्न करण्याकरिता लागणाऱ्या साधनांची जुळवाजुळव कशी करावी ती माहिती तुम्हास अवश्य देईल ! शास्त्राचे मूलभूत सिद्धांत फक्त असेच मानले पाहिजेत की, ज्यांचे अपवाद आपल्यास माहिती आहेत इतकेच नव्हे तर, ते दूर कसे करावे हे देखील आपल्यास सांगता येते, फलज्योतिषासंबंधी आपण विचार करू लागल्यास आपल्यास काय आढळेल ? फक्त हेच की, त्यातील मूलभूत गोष्टी ज्या आतापर्यंत सिद्धांतरूप मानल्या गेल्या, त्या आजतर भ्रामक असल्याचे समजून आलेच पण ऐतिहासिक काळात देखील त्या भ्रामकच होत्या हे देखील स्पष्ट ठरले. याचा स्पष्ट अर्थ असा की, पूर्वाचार्य आणि त्या शास्त्राचे प्रणेते, यांनी केवळ अज्ञानामुळे त्या खऱ्या मानल्या, यामुळे ते प्रामाणिक होते, ही गोष्ट ज्याप्रमाणे मान्य केल्याशिवाय गति नाही; त्याप्रमाणेच त्या भ्रामक पायावर आधारलेल्या असल्याचे समजूनही आज आपण त्यांचे शास्त्रत्व मान्य केल्यास, आपण ढोंगी आणि गतानुगतिक आहो, किंवा अगतिक तरी आहो, अशी कबुली देण्याशिवायही गत्यंतरच नाही ! जगातील सर्व ज्योतिःशास्त्रज्ञानी फलज्योतिषशास्त्राला आधार म्हणून ग्रहांची गतिस्थिति आणि कुण्डली मांडण्याकरिता आरंभस्थान म्हणजे लग्न निश्चित करणे, या दोनच गोष्टी मुख्य मानल्या आहेत. ग्रहांच्या गति-स्थितीसंबंधी वर पुरेसे विवरण झाले आहे. आता कुण्डलीसंबंधी विचार करू.

## कुंडली

लग्न म्हणजे कुण्डलीचा मुख्य आधारच मानला जातो. कारण तेच कुण्डलीतील प्रथमस्थान किंवा तनुस्थान होय. अमरकोशात ' राशीनामुदयोलग्नम् ' ( राशीच्या उदयाचा काळ म्हणजे लग्न होय. ) अशी ' लग्न ' या शब्दाची व्याख्या केली. सर्व ख–चक्राचे बारा भाग करून प्रत्येक भाग म्हणजे राशि असे समजले जाते. बारा राशींची बारा नावे आहेत. भारतीयांनी राशींची नावे, इजिप्शियन आणि खाल्डियन लोकांकडून घेतली, असे अनेक विद्वानांचे मत आहे, आणि ते बरोबर असावे असे म्हणावे लागते. कारण वेदान्त किंवा अति प्राचीन ग्रंथात राशींची नावे आढळत नसून फक्त नक्षत्रांची नावे सापडतात. नक्षत्रे सत्तावीस आहेत. तेव्हा सवादोन नक्षत्रांचा एक राशि असे बरोबर बारा भाग पडतात, आणि कुण्डलीतील बारा घरांची अशा रीतीने सोय लागते. पण प्रश्न असा आहे की प्रत्येक राशीचे आरंभस्थान कसे ठरवावयाचे ? कारण प्रत्येक राशीने व्यापिलेला आकाशाचा भाग सारखा नाही. फलज्योतिषाच्या सिद्धीकरिता पुढेमागे अशा भागांची जरूर पडेल, अशी विधात्याला बहुधा कल्पनाच नसावी ! त्यामुळे त्याने राशींचे तारकापुंज आकाशात कोठेतरी आणि कसेतरी फेकून ठेवले आहेत ! भावी कालात फल-ज्योतिषाकरिता होणारा त्यांचा उपयोग त्यास उत्पत्तीच्या वेळीच समजता तर, समसंख्य आणि शुक्रासारख्या अत्यंत तेजस्वी अशा तारकांचे पुंज, त्याने अगदी बरोबर विषुववृत्ताच्या रेषेवर, दोहोंच्या मधील अंतर बरोबर तीस अंश ( पण अंश म्हणजे काय व किती अंतर, हे तरी बेट्याला समजते की नाही, याचीही शंकाच आहे ! ) ठेऊनच, रांगेने लावून ठेवले असते ! अखेर ज्योतिष्यांनी विधात्याची ही चूक थोडीबहुत सुधारण्याचा प्रयत्न केला. म्हणजे असे की प्रत्येक राशीने व्यापिलेला आकाशाचा भाग आक्रमण करण्यास ग्रहास किती काल लागेल ते ठरवून टाकले ! अर्थात या पद्धतीचा उपयोग काहीसा किचकट असल्यामुळे बहुधा ज्योतिषी करीतच नाहीत ही गोष्ट वेगळी ! ज्योतिष्यांना विधात्याची ही एक चूक सुधारता आली; पण विधात्याच्या आणखीही अशा अनेक चुका आहेत. त्या ज्योतिषी सर्व समर्थ झाले तरी कशा सुधारणार ? कारण काही नक्षत्रपुंज विषुववृत्ताच्या फारच








दक्षिणेकडे आहेत, तसे काही फारच उत्तरेकडे आहेत. त्यामुळे दक्षिणेकडील तारकापुंजांचा उदय उत्तरध्रुवाकडील भागात दिसणार नाही, आणि उलट उत्तरेकडील तारकापुंजाचा उदय अगदी दक्षिणेकडील भूप्रदेशात दिसणार नाही. आणि प्रत्यक्ष दोन्ही ध्रुवांवर दृश्यमान अशा सर्वच तारकांचे चक्र छत्रीप्रमाणे मस्तकावर फिरत राहिल्याने त्यास उदयही नाही. आणि अस्तही नाही ! त्याचे उदयास्त तेथील सूर्याच्या वास्तव्याप्रमाणे, सहा सहा महिने अथवा कमी अधिक कालावधीचे असणार हे उघड आहे ! अशा रीतीने 'राशीनामुदयोलग्नम्' ही 'लग्न' या शब्दाची व्याख्याच, पृथ्वीवर सर्वत्र लागू नसल्याने चुकीची ठरते. कारण, त्यामुळे पृथ्वीवरील बऱ्याच मोठ्या प्रदेशातील लोकांना फलज्योतिषाचा फायदा मिळू शकणार नाही हे अशा परिस्थितीवरून दिसून आलेच ! या सर्वाचा अर्थ असा की, ग्रहांची गतिस्थिति ज्याप्रमाणे कालाबाधित नाही त्याप्रमाणेच कुण्डलीचा गाभा समजले जाणारे जे लग्नस्थान ते स्थलाबाधित नाही ! आणि याच कारणास्तव बहुधा "आता फलज्योतिष शास्त्र या संज्ञेस पात्र राहिले नाही," असे विचारवन्ताचे मत असावे ! कारण त्यातील कोणताच सिद्धांत सर्वकाळी आणि सर्वस्थळी टिकण्यासारखा नाही, हे आतापर्यंत वर आपल्याला दिसून आलेच !

## भुक्त-भोग्य स्थिति

प्रत्येक पंचांगात आणि क्वचित कुंडलीत देखील रवीची त्या दिवसाची भुक्त-भोग्य स्थिति दिलेली असते. पृथ्वीच्या संदर्भात रवि स्थिर आहे, हे जर खरे तर पंचांगातून दिलेल्या रवीच्या भुक्त-भोग्य स्थितीचा खरा अर्थ काही निघू शकतो किंवा काय, याचा थोडा आपण विचार करून पाहू या. सूर्य ज्या राशीस असतो तो राशि अस्तंगत असतो, ही गोष्ट बहुधा सर्वांना माहिती असेल. याचा अर्थ असा की, सूर्याभोवती फिरणाऱ्या पृथ्वीच्या वर्तुळाकार भ्रमणमार्गाचे बरोबर दोन भाग करणारी रेषा ( वर्तुळाचा व्यास ) काढली तर, एका टोकाला पृथ्वी असेल, दुसऱ्या टोकाला तो अस्तंगत राशि असेल, आणि बरोबर मध्यावर सूर्य असेल, अशाच स्थितीत फक्त त्या राशीवर सूर्य आहे असे समजून त्याची भुक्त-भोग्य स्थिति दर्शविल्याचे समाधान मानून घेता येईल ! पण ही खरोखर सूर्याची भुक्त-भोग्य स्थिति असू शकते का ? पृथ्वीसभोवती सूर्य फिरतो अशी कल्पना होती त्यावेळी हे सर्व ठीक होते. पण आता आपल्यास असे निश्चित माहिती आहे की, सूर्य हा गोल स्थिर असून आपले दिवस. रात्र आणि आपले वर्ष यांचे मोजमाप आपण केवळ पृथ्वीच्या गतीवरून करतो. पृथ्वीची स्वतःभोवती एक चक्कर म्हणजे आपले अहोरात्र आणि तिची सूर्याभोवती एक प्रदक्षिणा म्हणजे आपले वर्ष, ही गोष्ट आता शाळेतील तिसऱ्या चौथ्या वर्गातील मुलालाही माहिती आहे ! अर्थातच पंचांगात दिलेली सूर्याची भुक्त-भोग्य स्थिति ही सूर्याची नसून, पृथ्वी, सूर्य आणि अस्तंगत राशि– म्हणजेच सूर्यराशि– हे वर्तुळाच्या एकाच व्यास-रेषेवर असल्याने पृथ्वीवरील लोकांना त्या राशीला सूर्य असल्याचा भास होतो इतकेच ! म्हणजे सूर्यराशि किंवा त्या राशीतील त्याची भुक्त-भोग्य स्थिति ही वस्तुस्थिति नसून ते केवळ एक भ्रामक दृश्य आहे, असेच मानले पाहिजे, ही गोष्ट आता सहज लक्षात येईल.

वरील सर्व विवेचनावरून दुसरा एक निष्कर्ष निघतो तो असा की, पंचांगातून दिलेला सूर्यराशि किंवा त्या राशीतील सूर्याची भुक्त-भोग्य स्थिति या गोष्टी सूर्याच्या नाहीत ही गोष्ट खरी असली तरी त्यावरून पृथ्वी या ग्रहाचा राशि आणि त्या राशीतील तिची भुक्त-भोग्य स्थिती मात्र आपल्याला अगदी सहज समजून येतात ! पृथ्वी या ग्रहाला कुण्डलीत किंवा पंचांगात स्थान नाही ही गोष्ट वेगळी. आपण पृथ्वीवरच रहात असल्यामुळे पृथ्वीची शुभाशुभ फळे सर्वच आपल्याला दृष्ट आहेत आणि ती भोगल्याशिवाय आपल्याना सुटकाच नसल्याने पृथ्वी या ग्रहाचा विचार पंचांगात अथवा कुण्डलीत नाही, हे योग्यच म्हटले पाहिजे. पण वर आपण, वर्तुळाच्या व्यासरेषेवर एका टोकाला पृथ्वी आणि दुसऱ्या टोकाला सूर्यराशि– अस्तंगत राशि– आणि त्या राशीतील सूर्याची भुक्त-भोग्य स्थिति, असे जे म्हटले त्यावरून अस्तंगत सूर्यराशिपासून बरोबर सातवे स्थान आणि त्या स्थानी असलेल्या ग्रहाची भुक्त-भोग्य स्थिति या गोष्टीही निर्णायक रीतीने ठरतात. सूर्यापासून सातव्या राशीला असलेला ग्रह म्हणजे आपण रहात असलेली पृथ्वी हे काय आता निराळे सांगावयास पाहिजे.








## वाचकांचा पत्रव्यवहार —

(१)

श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांचे नवभारताच्या मार्च १९६४ च्या अंकातील पत्र वाचले. त्याना लेखाचा आशय बरोबर कळला. मला 'आर्यांच्या भारतात प्रवेशाची कालगणना' करताना ज्योतिष पद्धतीचा उपयोग करावयाचा नव्हता. तो मी का करीत नाही याची थोडक्यात कारणे दिली आहेत. त्यात लो. टिळक व जेकोबी यांचा ज्योतिषविषयक कालगणना करणारात प्रमुख म्हणून उल्लेख केला आहे. 'ज्योतिष पद्धतीप्रमाणे हा काल इ. स. पूर्व १०००० ते २००००, ठरतो' असे वाक्य आहे. तो काळ लो. टिळकांचा अथवा जेकोबीचा आहे असे माझे मुळीच म्हणणे नाही. ज्योतिषविषयक कालगणना फार प्राचीन असते एवढेच मला सांगावयाचे होते. तसे मी लेखात स्पष्टही केले होते. ते श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांना बरोबर कळले देखील, वास्तविक पत्र लिहून 'टिळक व याकोबी यांच्यामते वेदकाल खि. पू. ६००० ते ४००० आहे' हे त्यांचे ज्ञान वाचकासमोर मांडण्यापेक्षा दुसरी काही पत्र लिहिण्याची आवश्यकता असल्याचे दिसत नाही.

(२) त्यांच्या 'दोन शब्दा' पैकी पॅरिग्राफ (२) मध्ये त्यानी वेदांग ज्योतिषातील काही उतारे दिले ते संपूर्णतः अनवश्यक व लेखाशी बिल्कूल संबंधित नाहीत. त्यानी ते कशासाठी लिहिले ते माझ्यापेक्षा वाचकानाच समजण्याची जास्त शक्यता आहे!

(३) शेवटच्या पॅरिग्राफमध्ये श्री. वऱ्हाडपांडे यानी 'देशमुखांच्या या व पूर्वीच्या लेखात पुष्कळच भाकडकथावजा (अधोरेखा आमची) विधाने आहेत. त्यांचे लेख पूर्ण झाल्यावर जरूर वाटल्यास पुढे त्याचा समाचार घेऊ असे काहीसे खालच्या पातळीवर उतरून लिहिले आहे. त्याबाबत मला नम्रपणे एवढेच सांगावयाचे आहे की मी स्वतःला सर्वज्ञ समजत नाही (व हातात येईल त्या विषयावर लिहिण्याचा माझा परिपाठ नाही). मी ज्या विषयावर लिहीत आहे त्या विषयाचा प्रदीर्घ काळ अभ्यास करून अत्यंत काळजीपूर्वक लिहिले आहे. त्यात पुराव्याची कोठेही गल्लत होऊ नये याची काळजी घेतली आहे. तसेच त्यातून जे निष्कर्ष काढले त्यात तर्काची कास कधीही सोडली नाही. भारतातील आणि बाहेरच्या प्रथमश्रेणीच्या इंडालजिस्टनी त्याशी सहमत असल्याचे अभिप्राय दिले आहेत. असे असले तरी मनुष्याकडून चुका ह्या होणारच. त्या जर श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यानी खालच्या पातळीवर न येता सहृदयतेने दाखविल्यास (त्यांचे इंडालजीचे आणि ऋग्वेदाचे ज्ञान कितीसे आहे, व या विषयावर लिहिण्याची त्यांची पात्रता किती आहे याची मला कल्पना नाही.) मी त्यांचा आभारी राहीन. मला उत्तर देता आल्यास अवश्य देईन. त्यांचे म्हणणे बरोबर असल्यास स्वीकार करीन. माझी त्याना विनंती आहे की त्यानी 'भाकडकथावजा विधानांचा अवश्य समाचार घ्यावा' म्हणजे भाकडकथा कोणाच्या श्री. वऱ्हाडपांडे यांच्या की माझ्या हे नवभारताच्या सूज्ञ वाचकाना ठरविणे सोयीचे होईल.

— प्र. रा. देशमुख

---

(२)

रा. संपादक नवभारत यास —

नवभारताच्या फेब्रुआरी व मार्चच्या अंकातील श्री. प्र. रा. देशमुख यांचे "सिंधु संस्कृति आणि आर्यांच्या भारतातील प्रवेशाची कालगणना" या विषयावरील लेख वाचले. प्राचीन भारतातील काल्पनिक वंशसंघर्षाबद्दल पाश्चात्य पंडितांनी ज्या भाकडकथा रचून ठेवल्या आहेत त्यांचा नमुना म्हणून या लेखांकडे बोट दाखविता येण्यासारखे आहे. विस्तारभयास्तव काही मुद्यांचा खाली थोडक्यात उल्लेख करीत आहे.

(१) वेदांचा काल खि. पू. ५००० ते ४००० आहे असे अनेक ज्योतिषविषयक प्रमाणांनी सिद्ध होते. या प्रमाणांचे सारांशरूप विवेचन मी "वेदांचा काल" या माझ्या नवभारतातील लेखात केले आहे. "सिंधु संस्कृती"चा काल वेदकालापेक्षा पुष्कळच अलीकडचा आहे. यामुळे देशमुखांच्या साऱ्या कुतर्कांचा पायाच ढासळतो. किंबहुना वेदकालसंबंधीच्या निर्णायक ज्योतिषविषयक प्रमाणांकडे दुर्लक्ष करण्याचा पाश्चात्य पण्डितांचा दुराग्रह "आर्यांच्या" स्वारीविषयीच्या त्याच्या मूलभूत पूर्वग्रहातून उद्भवला आहे असे म्हणता येईल.

(२) वंशकल्पना आधुनिक जननशास्त्राच्या आधारे सिद्ध होत नाही. तेव्हा "आर्य" नावाचा



अनुक्रमणिका








एक वंश कधीकाळी अस्तित्वात होता या समजुतीवर आधारलेली तर्कटे हवेतील किल्ल्यासारखी आहेत.

(३) वेदवाङ्मयात आर्य हा शब्द एखाद्या वंशाचा वाचक म्हणून येत नाही. सुसंस्कृत, उदात्त या अर्थाने येतो. वैदिक आर्यांचा वर्ण हल्लीच्या भारतीयां-प्रमाणेच काळा, पिंगट, गोरा वगैरे अनेक प्रकारचा होता. त्याचे इतर कोणतेही पृथगात्मक शरीरविशेष वर्णिलेले नाहीत.

(४) मोहेंजोदारो व हरप्पा येथे "आर्यां"ची प्रेते सापडली नाहीत यावरून आर्य त्यावेळी भारतात नव्हते असे देशमुख अनुमान काढतात. देशमुखांच्या मते ज्या आर्यांनी भीषण लढाया करून या शहरांचा नाश केला त्यांच्यातला एकही या प्रचंड लढायात हरप्पा व मोहेंजोदारो येथील रणभूमीवर गेला नाही हे कसे काय ?

(५) इंद्र व त्याने नष्ट केलेल्या पुरांची वेदातील वर्णने अद्भुत व नैसर्गिक घटनावरील रूपकासारखी आहेत. इतकी की इंद्र हा कुणी खराखुरा मानव होता व त्याचे पराक्रम या भूतलावर गाजले होते अशी ऋचाकारांची समजूत दिसत नाही. या वर्णनावरून ऐतिहासिक अनुमाने काढणे धोक्याचे आहे.

(६) दोन पक्षात लढाया झाल्या म्हणून ते पक्ष वेगळ्या वंशाचे वा वेगळ्या देशातले होते असे ठरत नाही. शैवांचा तुच्छतापूर्वक उल्लेख, शहरे जाळणे वगैरे प्रकार दक्षिण भारताच्या अर्वाचीन इतिहासात देखील आढळतात.

(७) संस्कृत व युरोपीय भाषातील शब्दसाम्या-वरून मुख्यतः आर्यांच्या स्वारीचे थोताण्ड उभारले गेले आहे. पण तामील सारख्या "द्रविड" भाषेचे प्राचीनातले प्राचीन स्वरूप घेतले तरी त्याचे संस्कृताशी युरोपीय भाषापेक्षा अधिक शब्दसाम्य आहे.

(८) सुधांशुकुमार रे यांनी वीस वर्षे मोहेंजोदारो येथील चित्रलिपीवर संशोधन केले. त्यांच्या मते "या चित्रलिपीतील लेख संस्कृत किंवा पाली असावे. याच भाषेतून बंगाली, तामिल, हिन्दी व गुजराती या भाषा निघाल्या असाव्या. मोहेंजोदारो येथील निवासी वैदिक संस्कृतीचे 'आर्य'च होते." रे यांच्या या सिद्धांताने देशमुख व त्यांच्या मताच्या इतर लेखकाच्या विकृत तर्कटांचे बूडच नाहीसे झाले आहे.

(९) वेदच नव्हे तर जगातील कोणत्याही प्राचीन वाङ्मयात "आर्य" भारताबाहेरून आले असा एका शब्दानेही उल्लेख नाही.

— नी. र. वऱ्हाडपांडे

---










# सार-संकलन

## राष्ट्रवादाचा जागतिक राजकारणात वरचष्मा

लंडन येथून प्रकाशित होणाऱ्या "दि इकॉनॉमिस्ट"च्या २२ फेब्रुवारी १९६४ च्या अंकात आंतरराष्ट्रीय वृत्तनिवेदनाच्या निमित्ताने पहिला प्रश्न उपस्थित केला आहे की, सुप्रसिद्ध एकजुटीतील राष्ट्रे फुटून बाहेर पडत आहेत अशावेळी तथाकथित तटस्थ राष्ट्रांची नवी एकजूट निर्माण करण्याचा प्रयत्न कसा सफल होणार ?

"बरीचशी भांडणे कुटुंबातच निर्माण होणार; बरेचसे खून घरगुती वादातून घडून येतात म्हणून याबद्दल आश्चर्य करावयास नको की मित्रराष्ट्रे तंटेखोर भागीदारांसारखी दिसू लागली आहेत. चौ एन लाय एकीकडे आश्वासन देतो की, चीन व रशिया यांचा संबंध अमर भक्तीने जोडला गेला आहे. व असे म्हणत असताच पेकिंगचे नेते क्रुश्चोव्हला मार्क्सवादाची प्रतारणा करणारा फितुर, एवढेच नव्हे तर "सोव्हिएटचा शत्रू" म्हणूनही म्हणण्यास दिक्कत बाळगीत नाहीत. ब्रिटन व फ्रान्स १९४७ पासूनचे मित्र आहेत परंतु ब्रिटिश खाडीच्या संकुचित पट्ट्यावर दोघेही खळबळ माजवीत आहेत. क्यूबाला निरुपद्रवी स्वरूपाची वाहतुकीच्या बसेससारखी निरुपद्रवी साधने निघतात म्हणून अमेरिकेचा जळफळाट होतो. त्यावर मित्रराष्ट्रे वॉशिंग्टनच्या नेत्यांना सांगतात की, तुमच्या व आमच्या कृतीत मूलतः फरक नाही. तुम्ही रशियाला गहू विकता तो क्युबाच्या जनतेच्या तोंडापर्यंत पोहोचतो ग्रीस आणि तुर्कस्थान युद्धाच्या सीमारेषेवर उभे आहेत. भारताशी पाकिस्तानचा चाललेला तंटा अमेरिका तटस्थ राहून पाहात आहे यामुळे पाकिस्तान अमेरिकेवर रागावले आहे. त्याचप्रमाणे पाकिस्तानचे व फ्रान्सचे चीनशी जुळत असणारे नवे प्रेमसंबंध पाहून अमेरिका चिंतातुर झाली आहे.

"एकजुटीचे घटक असणे एवढेच आपसातील भांडणाचा बंदोबस्त करण्यास पुरेसे कारण होऊ शकत नाही. एकजुटीतील कोणीही दोघे आपसात मारामाऱ्या करू शकतात. अरबांची एकजूट फार वेळ टिकेल अशी अपेक्षा कोणीही बाळगीत नाही. मोरोक्को व अल्जेरिया यांच्यातील तंटा थंडावतो न थंडावतो तोच येमेनच्या बाजूला युद्ध धुमसू लागले आहे. आफ्रिकेतील राज्ये ॲडिस अबाबा येथे सगळे प्रश्न शांततेने सोडविण्याचा नऊ महिन्यापूर्वी संकल्प सोडतात आणि त्यानंतर लगेच सोमाली व इथिओपिया यांच्यात अघोषित युद्ध सुरू झाले आहे. एकंदरीत शेजारच्या राष्ट्राशी स्नेहसंबंध जुळविणे सगळ्यात कठीण असते. सायप्रस, खंदा, बंगाल, युगोस्लाव्हिया, अल्बानिया इस्रायल इत्यादि सरहद्दींकडे पाहिल्यास असे दिसते की, शेजारभावच बाधत आहे.

"समान संकटाचे भय ओसरू लागले की, दुय्यम दर्जाच्या विरोधांना महत्व येऊ लागते. या दुय्यम दर्जाच्या विरोधातूनच अधिक व्यापक संघर्षांना वाव मिळतो. या प्रकारचे संकट जगाला सद्यःस्थितीत भेडसावत आहे असे म्हणावे लागते.

"एकजुटीचे आंतरराष्ट्रीय राजकारण मागे पडून त्याच्या ठिकाणी 'तटस्थ राष्ट्रांचे पेव' फुटू लागले आहे. किती तटस्थ राष्ट्रांचे ओझे वाहायचे अशी चिंता प्रधान राष्ट्रांना लागून राहिली आहे. पाश्चात्यांच्या विचारांची दिशा बदलून टाकणारी नवी परिस्थिती उत्पन्न होत आहे. अणुशक्तीची दोन टोकात समान विभागणी, प्रचंड मानवशक्तीच्या राष्ट्राच्या आक्रमक प्रवृत्तीची भयदर्शक सूचना आणि अर्ध्याकच्या मित्रांचा संबंध वरदायक न ठरता शापकारक ठरणार अशा प्रकारचा लागलेला नवा राजकीय शोध या तीन गोष्टींनी पश्चिमी विचारात बदल घडून येत आहे. याच गोष्टींमुळे रशियाच्या विचारातही बदल झालेला अप्रत्यक्षपणे सूचित होत आहे. रशियाचेही धोरण परिवर्तन पावत आहे.

"चीनचा क्रुश्चोव्हवर एक महत्त्वाचा आरोप असा की क्रुश्चोव्हने नासर, नेहरू, न्येरेरे सारख्या किंवा टिटो सारख्या राष्ट्रनेत्यांशी दीर्घकालीन सहजीवनात रमण्याचे ठरविले आहे. कारण साम्राज्यशाहीच्या पकडीतून सुटलेली नवजात राष्ट्रे कम्युनिस्ट ध्येयवादाकडे किंवा कम्युनिस्ट नेतृत्वाकडे आकर्षित होत नाहीत असे त्याला दिसून आले आहे. कॅस्ट्रो, बेनबेला, यांच्यासारखे नेते परिवर्तनवादी मास्कोला अधिक महत्त्व देतात आणि शुद्ध क्रांतिकारक पेकिंगची उपेक्षा करतात.

" तटस्थ राष्ट्र या शब्दाचा अर्थ आता गोंधळात टाकतो. तटस्थ राष्ट्रांच्या राज्याशी दृष्टिकोण नेमका कोणत्या प्रकारचा आहे याचा उलगडा अलीकडे होऊ शकत नाही. ही परिस्थिति चीन-रशिया फुटीमुळे निर्माण झाली आहे. याचे उत्तम उदाहरण म्हणजे डॉ. कॅस्ट्रोचा क्युबा. अणुशक्ति प्रतिबंधक करारावर हस्ताक्षरी करण्याचे आश्वासन डॉ. कॅस्ट्रो देतात. परंतु चीनला खूष ठेवण्याकरिता प्रत्यक्ष हस्ताक्षरी करीत नाहीत."

" याचप्रकारे पश्चिमी राष्ट्रांच्या एकजुटीमध्ये जनरल द गॉलने गोंधळ निर्माण केला आहे. अमेरिकेच्या कक्षेतील ग्रीस, इंडोचायना आणि लॅटिन अमेरिका यांची आराधना तो करू लागला आहे ही ही गोष्ट अर्थपूर्ण आहे. ' एकसंध 'पणा दाखविणारी एकजूट पश्चिमी राष्ट्रांना महत्त्वाची कधीच वाटली नाही हेही येथे लक्षात ठेवले पाहिजे ही गोष्ट सुवेझच्या पेचप्रसंगाच्या वेळीच उघडकीस आली आहे. एकसंघ एकजूट बिघडण्याचे खरे भय कम्युनिस्ट राष्ट्रांना वाटत असते. एकसंधपणा नसणे ही गोष्ट पश्चिमी राष्ट्रांच्या अंगवळणी पडलेली आहे. कित्येकवेळा ही गोष्ट त्यांच्या फायद्याची ठरते.

" एकजूट म्हणजे संपूर्ण व सर्वांगीण सैनिकी एकजूट ही गोष्ट बिन कम्युनिस्ट जगाच्या नैसर्गिक परिस्थितीशी वस्तुतः मूळापासूनच विसंगत आहे. तटस्थपणाचेसुद्धा अर्थ विविध प्रकारचे होत आहेत. तटस्थपणा या शब्दात स्पष्टपणापेक्षा गूढपणा जास्त येऊ लागला आहे. तटस्थपणाची कल्पना सर्वत्र लोकप्रिय होऊ लागली त्यामुळे तिचे प्रत्येक ठिकाणी अर्थ भिन्नभिन्न होऊ लागले. चीनने भारताची अशी परिस्थिति करून सोडली आहे की, भारतास तटस्थ कसे म्हणावे हाच प्रश्न पडतो. एकवेळ पाकिस्तान तटस्थपणाकडे अधिक झुकले आहे असेही म्हणता येईल. १९६१ साली तटस्थ राष्ट्रांची बेलग्रेड येथे परिषद भरली होती. तशीच पुनः भरविण्याचा प्रयत्न सुरू आहे. १९६१ सालच्या तटस्थ परिषदेपेक्षा या दुसऱ्या बेलग्रेड परिषदेस अधिक संयमित निर्णय घेतले जातील असे दिसते. तटस्थपणा अधिक सन्मानार्ह झाला असला तरी जागतिक राजकारणातील वाढत्या फुटीवरच तो प्रकाश पाडतो व तटस्थपणाचा अर्थ लावणे अधिक गोंधळाचे होते."

## युरोपियन वैज्ञानिकांचा अमेरिकेकडे वाहणारा प्रवाह

मँचेस्टर गार्डियनच्या १३ फेब्रुवारी १९६४ च्या अंकांत म्हटले आहे की, अमेरिकेकडे जाणाऱ्या विज्ञानपंडितांचा व तंत्रज्ञांचा प्रवाह अडविणे सद्यःस्थितीत कठीण आहे. इंद्रियविज्ञान शास्त्रज्ञ प्रा. आयन बुश यानी बर्मिंगहॅम विद्यापीठातील पदाचा राजीनामा देऊन अमेरिकेस प्रयाण केले. या घटनेमुळे या प्रश्नाला अधिक चालना मिळाली. सोव्हिएट युनियन किंवा युरोपियन कम्युनिस्ट राष्ट्रे वगळल्यास युरोपातील सर्व राष्ट्रांपुढे हा जाचक प्रश्न चिंता उत्पन्न करीत आहे. पश्चिम जर्मनीतील तंत्रज्ञ व विज्ञानवेत्ते देखील मोठ्या प्रमाणात अमेरिकेकडे ओढले जात आहेत. बुद्धिमत्तेचे एक प्रकारचे शोषणच चालले आहे असाही आरोप लोक करीत आहेत. परंतु युरोपियन राष्ट्रांनी यासंबंधांत आत्मपरीक्षण केले पाहिजे असाही विचार शिक्षणतज्ज्ञ मांडू लागले आहेत ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट होय. नुसत्या शिक्षणतज्ज्ञांच्या व वृत्तपत्रांच्या हकाटीने हा प्रश्न सुटणार नाही. युरोपातील सरकारे या बाबतीत अधिक जागरूक व्हावयास पाहिजेत.

" या परिस्थितीचा विचार करता तीन महत्त्वाचे मुद्दे लक्षात घेणे आवश्यक आहे. एक, युरोपियन व ब्रिटिश विद्यापीठात काम करणाऱ्या मानव्य व विज्ञान विभागातील विद्वानांना अधिक सुखसोयी उपलब्ध करून देणे ही जितकी महत्त्वाची गोष्ट आहे तितकीच सुखसोयींबरोबर संशोधनाच्या किंवा अन्वेषणाच्या साधनांची अद्ययावत तरतूद निर्माण करणे ही महत्त्वाची गोष्ट आहे. जीवनाच्या अन्य क्षेत्रात ज्या तरतुदी आवश्यक ठरतात व सरकार त्यांबाबत प्रशासनाकडून योग्य ती काळजी घेते त्या तरतुदी विद्यापीठात नसल्या तरी सरकारला चालतात ही अधिक शोचनीय गोष्ट आहे. अमेरिकेत पंडितांना उत्तम वेतन, उत्तम सुखसोयी व उत्तम संशोधनाच्या प्रयोगशाळा प्राप्त होतात. युरोपने तिकडे दुर्लक्ष केले आहे.

" दुसरे असे की, विद्यापीठांच्या परिस्थितीत सुधारणा करणे हा जसा महत्त्वाचा मुद्दा तसाच अमेरिकेने

युरोपचे आपले मूलस्थान सुरक्षित ठेवण्याकरता हा वेगाने वाहणारा प्रवाह अधिक संथपणे वहावा म्हणून युरोपला विशेष आर्थिक मदत हा प्रश्न सोडविण्याकरिता केली पाहिजे.

" तिसरे, युरोपचा व अमेरिकेचा सांस्कृतिक समतोलपणा राखणे हीही महत्त्वाची गोष्ट आहे. अमेरिकेकडे जाणाऱ्या वैज्ञानिकांना व तंत्रज्ञांना युरोपचे सांस्कृतिक स्थान सुरक्षित आहे अशा तऱ्हेची आश्वासनात्मक भावना निर्माण करणे ही एक अत्यंत आवश्यक गोष्ट आहे.

## विज्ञान व समाज

'मँचेस्टर गार्डियन'च्या २० फेब्रुवारी १९६४ च्या अंकांत गॅलिलिओची चतुर्थ शताब्दि जवळ येत असल्याचे सांगून एक महत्त्वाचा विचार मांडला आहे–

" गॅलिलिओच्या जन्माची चतुर्थशताब्दि पूर्ण होत आहे. या प्रसंगी अमेरिकेत प्रयोगशाळा अत्यंत सुसंपन्न असल्यामुळे पंडितांचा प्रवाह तिकडे आकर्षिला जात आहे याबद्दल चाललेल्या हाकाटीबरोबरच आधुनिक विश्वात विज्ञानाचे कोणते कार्य आहे याचा विचार विज्ञानाने केला पाहिजे. कोपर्निकस, टायको ब्राहे, किंवा केप्लर यांनी विश्व हे कशा प्रकारचे आहे याबद्दल ॲरिस्टॉटलपेक्षा निराळे जे विवरण केले आहे त्यापेक्षाही गॅलिलिओने ते अधिक स्वच्छ स्वरूपात केले आहे. गॅलिलिओच्या मताने विश्वात जादुगिरीला स्थान नाही. प्रत्येक बुद्धिवादी प्रश्नाला बुद्धिवादाच्याच आधारे उत्तर केव्हातरी मिळालेच पाहिजे. न्यूटनने जी नवी यांत्रिक उपपत्ति काढली त्याची विधायक बैठक गॅलिलिओने निर्माण केली. जुनी उपपत्ति मोडून टाकणे एवढेच काम त्याने केले नाही. आशावाद व संशयवाद यांचे मीलन घडवून आणून विज्ञानाला निराळा अर्थ त्याने प्राप्त करून दिला. अटलांटिकच्या अलीकडे किंवा पलीकडे असलेला प्रत्येक विज्ञानपंडित गॅलिलिओचा ऋणी आहे.

" विज्ञानाचे कार्य काय आहे ? विज्ञान पंडित सुसंपन्न प्रयोगशालेकडे जाण्यास इतके का उत्सुक झाले आहेत ? सुसंपन्न प्रयोगशाला इतक्या मोठ्या प्रमाणात स्थापन करावयास पाहिजेत ? या प्रश्नाचे एक उत्तर असे की, गॅलिलिओच्या कल्पनेबाहेर विज्ञानाचे महत्व समाजाच्या दृष्टीने स्थापन झाले आहे. मानवी विश्व स्वतंत्र व समृद्ध होण्यास विज्ञान कारण आहे याचा मोठा पुरावा देता येतो व हे विश्व तसे राहू शकेल असेही सांगता येते. समाजावर विज्ञानाचा होणारा हा उपकार विसरता येत नाही.

" अमेरिकेतील काँग्रेसमध्ये विज्ञानास संपूर्ण महत्त्व देणारा गट आहे. तो असे समजतो की, विज्ञानाच्या योगाने शीतयुद्धही जिंकता येईल. हा एक प्रकारचा भ्रम आहे. विज्ञानाने मानवी समाजाचे अनेक व्यावहारिक फायदे करून दिले आहेत खरे, पण मानवाला अमर करणे हे विज्ञानाला साधेल असे म्हणणे धोक्याचे आहे."

प्राज्ञपाठशाळा-मण्डळ ग्रंथमाला

# धर्मकोश

# संस्कारकाण्ड

भाग १ ला

सुपररॉयल साइज, पृष्ठसंख्या ९००, किंमत ४५ रु.

संस्कारकाण्डाचा प्रथम भाग प्रकाशित झाला आहे. या भागांत संस्कारांसंबंधीं सामान्य विचार, गोत्र, प्रवर व सापिण्ड्य यांसंबंधीं विस्तृत शास्त्रार्थ, विवाहकाल, विवाहाचे प्रकार इत्यादि विषय आलेले आहेत. धर्मशास्त्राचें आधुनिक पद्धतीनें संशोधन करणाऱ्या संशोधकांस व प्राचीन पण्डित-याज्ञिक यांसही हा भाग अत्यंत उपयुक्त असल्यामुळें संग्राह्य आहे.

मिळण्याचें ठिकाण- प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ जि० सातारा, ]

卐 卐 卐 卐

❀ मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

❀ या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

❀ मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.



# योग्य मेट्रिक परिमाणांत खरेदीविक्री करा

बहुधा जुन्या वजनांचे मेट्रिक वजनांमध्ये सरळ रूपांतर करून वस्तु मागितल्या जातात. उदाहरणार्थ पावशेरासाठी २३३ ग्राम मागितले जातात, तसेच १ रत्तलाकरितां ४५४ ग्राम मागितले जातात. अशा तऱ्हेनें वस्तु मागणें हें दशमान पद्धतीच्या तत्त्वानुसार नाही. शिवाय यामुळें जुन्या पद्धतीप्रमाणेच आकडेमोड किचकट हिशेब करावा लागतो, परंतु दशमान पद्धतीचा एक मुख्य हेतु अशा तऱ्हेची क्लिष्ट आकडेमोड दूर करणें हा आहे.

वरील उदाहरणांत वस्तु मागण्याची योग्य पद्धत म्हणजे २५० ग्राम, ५०० ग्राम, २०० ग्राम अथवा ५०० ग्राम मागणें

| पूर्वी या मापानें घेत असाल | तर आता मागा |
|---|---|
| १ औंस (= २८ ग्राम) | ३० ग्राम |
| १ पौंड (= ४५४ ग्राम) | ५०० ग्राम |
| २ पौंड (= ९०७ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| ७ पौंड (= ३.१७ किलोग्राम) | ३ किलोग्राम |
| १४ पौंड या स्टोन (= ६.३५ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| २८ पौंड (= १२.७० किलोग्राम) | १० किलोग्राम |
| ५६ पौंड (= २५.४० किलोग्राम) | २० किलोग्राम |
| ११२ पौंड या हंड्रेडवेट (= ५१ किलोग्राम) | ५० किलोग्राम |
| १ टन (= १०१६ किलोग्राम) | १००० किलोग्राम |
| १ तोळा (= ११.६६ ग्राम) | १० ग्राम |
| १/१६ शेर या छटाक (= ५८ ग्राम) | ५० ग्राम |
| १/४ शेर या पाव (= २३३ ग्राम) | २०० ग्राम |
| १/२ शेर (= ४६७ ग्राम) | ५०० ग्राम |
| १ शेर (= ९३३ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| २.१/२ शेर (= २.३३ किलोग्राम) | २ किलोग्राम |
| ५ शेर (= ४.६६ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| १० शेर (= ९.३३ किलोग्राम) | १० किलोग्राम |
| २० शेर (= १८.६६ किलोग्राम) | २० किलोग्राम |
| १ मण (= ३७ किलोग्राम) | ४० किलोग्राम |
| २.१/२ मण (= ९३ किलोग्राम) | १ क्विंटल (१०० किलोग्राम) |



योग्य रीतीनें मेट्रिक पद्धतीचा अवलंब करा

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई